# डेकॅथलॉन : रिअल

## (मायनस)

श्रीधर तिळवे



**नवता प्रकाशन क्रमांक ११**

**डेकॅथलॉन : रिअल (मायनस)**



१६-सी, बिल्डिंग क्र. ५३, तपोवन,
एनएनपी अप्पर, गोरेगाव (पूर्व), मुंबई.
shridhar.tilve1@gmail.com
संपर्क : ९८९२२२९७३०

पहिली आवृत्ती : **२० मार्च २०११**

प्रकाशन :
**'नवता'**
**कीर्तिकुमार शिंदे**
६०२, आदित्य अपार्टमेंट,
आशानगर, कांदिवली (पूर्व),
मुंबई- ४००१०१
संपर्क : ९६१९९२२१२६
ई-मेल : navataa.prakashan@gmail.com

मुखपृष्ठ :
स्वीटी जोशी

अक्षर जुळणी-मांडणी :
**क्रांती दळवी**

मुद्रण :
**इंडिया प्रिंटिंग वर्क्स**
इंडिया प्रिंटिंग हाऊस,
४२, जी. डी. आंबेकर मार्ग,
वडाळा, मुंबई- ४०००३१




**मूल्य ११० रुपये**

जगातील समस्त श्रमिकांना

आणि

त्यांच्यासाठी लढणाऱ्या कार्यकर्त्यांना...

# माझ्यासमोरची श्रीधर तिळवेची कविता

श्रीधर तिळवेची कविता माझ्यासमोर उभी असते. म्हणजे त्याने एका विशिष्ट कालखंडात लिहिलेल्या काही कविता माझ्यासमोर असतात. खरे तर त्याची संपूर्ण कविता अजून लिहून संपलेली नाही (अशी आशा आहे). वाघाचे पट्टे बघून वाघ कळतोच की, संपूर्ण वाघाचे निकट दर्शन होण्याची वाट बघायचे कारण नाही. पण वाघ थोडासा जरी दिसला तरी संपूर्ण बघण्याची उत्कंठा लागते. धोकाही असतोच. मात्र वाघ दिसणंही आजकाल दुर्मिळच. बरे जंगलासमोर आपण येतो ते काही झोपेत चालत अचानक जाळीसमोर येत नाही. तसेच श्रीधरची कविता माझ्यासमोर अचानक आलेली नसते.

हा एक अनेकदा चर्चेत आलेला कवी असतो. कवितेसाठी आणि समीक्षेसाठी हा माहिती असतो. प्रस्थापित प्रकाशनसंस्थेने स्वीकारलेला कवी. तरीही समांतर, लघु, (अ)नियतकालिकांतून धीटपणे, थेटपणे आलेला कवी. अनेक समांतर कवींचा कवितेच्या सादरीकरणाला विरोध असतो, याने मात्र कवितेच्या अभिवाचनाचे,

सादरीकरणाचे कार्यक्रम केलेले. आपल्याबरोबर इतर कवी घेऊन कार्यक्रम केलेले असतात. आपल्या कवितेबरोबर इतर कवींच्याही कविता सादर केलेल्या.

यानेच एक चक्रव्यूह निर्माण केलेला असतो. याने कविता केलेल्या असतात. समीक्षा केलेली असते. एवढेच नव्हे याने स्वतःचा वेगळा समीक्षाव्यूह निर्माण केलेला असतो. त्यामुळे अनेक श्रेष्ठ, कनिष्ठ, अनिष्ट लेखनकर्मींमध्ये अस्वस्थता निर्माण केलेली असते. तो स्वतःच्या आणि इतरांच्या कवितांकडे किंवा वाङ्मयाकडे स्वत: स्थापित केलेल्या समीक्षा दृष्टीने बघून लिहीत असतो. त्यामुळे त्याच्या कवितेबद्दल लिहिणे, चिकित्सा करणे, टीका करणे, समीक्षा करणे याच्या जबाबदारीतून अन्य लेखनकर्मींनी स्वतःला नैतिकदृष्ट्या मोकळे केलेले असते.

त्यामुळे सलील वाघ वगळता कोणीही त्याच्या कवितेबद्दल विस्ताराने लिहिलेले नसते. मात्र शेरेबाजीत त्याचे नाव येते. त्याचे नाव वगळणेही सोयीचे नसते. तसा हा दुर्लक्षिण्याजोगा कवीच नाही. याच्या स्वतःच्या समीक्षालेखनाची दिशा जेव्हा स्वतःच्या कवितेकडे वळते तेव्हा स्वतःच्या कवितेची बलस्थाने मांडताना हा मुळीच संकोचत नाही. खोटा विनयही दाखवीत नाही. एक कवी दुसऱ्याच्या कवितेचे तोंड भरून (पण तोंडदेखले नव्हे) कौतुक करताना अभावानेच दिसत असताना हा इतरांचे कौतुक करताना दिसतो. त्याच ममत्वाने किंवा निर्ममपणे आपल्या कवितेची बलस्थाने आपल्या समीक्षेत मांडताना दिसतो. यातून काहींना असेही जाणवते, की श्रीधरने स्वतःच्या कवितेची स्वतःच स्तुती केली नसती तर आपण त्याचे श्रेष्ठत्व (थोडेसे तरी) मान्य केलेच असते की. जणू काय एखाद्या कवीची समीक्षा किंवा स्तुती एकानेच किंवा एकदाच करायची असते.

याची कविता समोर उभी असते तेव्हा एका महापाषाणासमोर उभे असल्याची जाणीव होते. त्यातून हातोड्याने जोरकसपणे छिन्नीवर घाव घातलेले असतात. काळजीपूर्वक निवडलेल्या विषयावर बेदरकारपणे छिन्नी-हातोडा चालवताना पडलेल्या शब्दांच्या कपच्या इकडे तिकडे उडालेल्या दिसत असतात. एकाच महापाषाणात अनेक विषयांवर शिल्पसमूह असतात. एकाच विषयात दुसरा विषय सुखेनैव घुसलेला असतो. शैली, शब्द इतक्या विविधतेने येतात आणि अनपेक्षितपणे येतात, की भाकित करणे कठीण व्हावे. यात तो अनेक संकेत झुगारताना-स्वीकारताना दिसतो. हळुवारपणे चुंबन घेतो आहे असे जेव्हा वाटते, त्याच्या दुसऱ्याच शब्दात कानाखाली काढल्याचे आवाज येतात.

एकाच कवितेत तो कॅशियस क्लेपासून ते मराठी कवींपर्यंत सगळ्यांचे संदर्भ

आणतो. ज्ञानेश्वरांपासून डहाक्यांपर्यंतचे कवी आणतो, त्यांच्या नावात श्लेष करतो, कधी त्यांच्या-त्यांच्या शैलीचे शब्दकळेचे दर्शन घडवतो, तेव्हा तो त्या-त्या कवीच्या कवितेचा प्रभाव नसतो, तर त्या कवीच्या शब्दांचा पोत वापरून हा वेगळेच कोलाज करतो.

बरेचदा एक सामान्य माणूस त्याच्या केंद्रस्थानी आहे. कधी तो बलुतेदारीच्या दिवसातला आहे, तर कधी विचारसरणीच्या युद्धातला, तर कधी शीतयुद्धकालीन आहे. कधी आदिम काळातला आहे. त्याच्याबद्दल कणव आहे. ज्या कवितेत तो सोविएतच्या विघटनाबद्दल बोलतो, त्यातच तो अत्यंत वैयक्तिक आयुष्याबद्दल बोलतो. पुड्या बांधणाऱ्या बापाला एकेकाळी मुंबईत स्वतःचे कामगार होणे आठवते. तर एका अत्यंत वैयक्तिक प्रेमकवितेत मराठी कन्नड भाषा-सीमावाद लिलया येतो. प्रेम व्यक्त होतं तेही रांगडेपणाने. तर कधी साहिर लुधियानवीची दाट छाया असणारी चंद्राची तुलना कवीचे विधान पिढीभर मागे नेते.

याच्या कवितेतला मी हा कधी शेतकरी असतो, कधी आत्यंतिक कवी असतो, तर कधी कविता न लिहिता भाषाच उतरवणारा असतो. कधी पर्यावरणाच्या बाजूने बोलणारा जीव जो माणूस असल्याचा अपराधगंड मानवजातीवर लादतो. कधी हा मृत्यूंजय नायक असतो. कधी एखाद्या शहरातून विस्थापित होणारा असतो. पण वेगवेगळ्या हिंदी सिनेमाचा लार्जर दॅन लाईफ नायक कोणत्याही रूपात दिसला तरी तो हिरो असतो. जसे बच्चनच्या सिनेमात तो कुली, स्मगलर, इन्स्पेक्टर, वेटर कोणाचीही भूमिका करीत असला तरी तो बच्चन असतो. (मात्र नसीरुद्दीन शाह काही सिनेमात नसीर नसून आंधळा, पारशी, क्रिकेटियर असा कोणी तरी असतो) तसा या कवितेचा मी हा एक सुपर-मी असतो, तो कोणत्याही वेषात वेगळा ओळखू येतो.

याच्या कवितेत ग्रीक किंवा अभारतीय मिथकथा आधुनिक काळात अवतरते, तर टॉलस्टॉयची नीतीकथाही कवितेत अवतरते. तर कधी अतिवास्तवात हा संचार करतो. शब्द मरण पावतो, कधी भाषा मरण पावते, जेव्हा बालपणीचा कुत्रा मरतो तेव्हा तर बालपणच सरते. कवी असताना सामाजिक बांधिलकी जशी दिसते, तशी कवी म्हणून जातीमुक्त होतानाही दिसतो.

कधी कधी एकाच कल्पनेची आवर्तने होताना वेगवेगळ्या दिशेने कविता जाते. झेरॉक्स (खरे तर फोटोकॉपी) होण्याच्या प्रक्रियेची दोन वेगळ्या कविता वेगवेगळी विधाने करतात. कोल्हापुराला गुडबाय करतानाच्या वेगवेगळ्या कविता असतात. तर

कधी एकाच कवितेत दोन पीळ दिसतात. एक विशिष्ट कविता, जी कवितेच्या निवेदकाचे आत्मचरित्र असते. त्या कवितेत एक साधारण कविता आवर्तनातून येते, ती एक गाव सोडतानाची असते. ती कोल्हापूर सुटतानाची नसते, ती कवीची नव्हे तर एका साधारण माणसाची गाव सुटतानाची असते. आणि अचानक त्या कवितेत सुपर-मी डोकावतो, नव्हे घुसतो, आणि तो स्वतःच्या पुनरागमनाचे भाकित करतो.

कधी कधी तो एखाद्या वाक्याचं किंवा शब्दांचे आवर्तन करताना दिसतो... कवी झालो, शब्द जो... माणसाला... किती जागा हवी. या आवर्तनातून कधी आपण परत त्याच जागेवर येतो. जणू एकाच जागेवर फुगडी घातल्यावर पायाने खूप चाललो असलो तरी आपण एकाच जागेवर असतो. दमछाक झालेली असते, पण समोरचे दृश्य बदललेलेच नसते. कधी एखाद्या लाटेवर वर खाली व्हावे तशी अनेक आवर्तने करून झाल्यावर आपण थोडेसेच सरकलेलो असतो.

आणि मग आपण पुन्हा श्रीधर तिळवेच्या कवितेसमोर असतो. आपल्यासमोर गेल्या तीस-चाळीस वर्षांचा काळ असतो. राजकीय, सामाजिक संदर्भ असतात. आपल्यासमोर कोल्हापूर असो किंवा नाशिक, आपल्यासमोर चळवळी असोत अथवा उटपटांग फॅशनच्या लाटा असोत, मराठी भाषाविश्वात गेल्या चाळीसेक वर्षात जे झालंय, जे होतंय त्यापेक्षा त्याची कविता वेगळी नसते. आता तर आपण मराठी नाही शिकलो, तरी महाराष्ट्रात चालतंय. मराठी नाही वाचलं तरी चालतंय. कविता नाही वाचली तरी चालते. एका बाजूला खाद्य पिकवणारे शेतकरी जगण्याच्या खुंटाभोवती अगतिकपणे आत्महत्या करतायत. दुसऱ्या बाजूला शेतजमिनी वाढत्या महानगरांसाठी मोडीत निघून ते जमीन मालक तात्पुरते मालामाल होताना दिसतात. परभाषेतल्या परकीय ॲक्सेंट आत्मसात करून कान भाड्याने देताना स्वतःची भाषा, स्वतःचे तारुण्य वाया जाते. अशात कविता आपल्याला वाचवेल असा भरवसा वाटेनासा झालाय.

अशात सुपरआत्मविश्वासात श्रीधरच्या कवितेतला सुपर-मी दिसू लागतो. पण जसजसे रंग उडत जातात, तेव्हा काळेपांढरे रंगच उडतात. कृष्णधवल सिनेमाच्या काळात आपल्याकडचे हिंदी सिनेमाचे नायक, नायिका ट्रॅजिडी किंग, क्वीन होत असत. वो सुबह कभी तो आयेगी असा भाबडा का होईना आशावाद विझत असतो. वैराण परवश जिंदगीत स्वप्न विकणारा काळ दिसत नसतो. तसा श्रीधरचा सुपर-मी एकटा पडताना दिसतो. तेव्हा प्रश्न पडतो, की हा काळ चुकवून आधीच जन्माला आलाय की काय? श्रीधरच्या कवितेतला आधुनिकोत्तर जगातला सुपर-मी

बघताना वाटते की हा काळाच्या पुढचा आहे का?

त्यामुळेच असेल कदाचित या कवितेवर लिहिले तर या काळातील, काळाच्या पुढील आणि मागील कवितेची तपासणी आपोआपच करता येईल. ज्या तडफेने आणि असोशीने या कविता लिहिल्या जातात ते बघता, हद्दीचा वाद न घालता, भाषेचा एफआयआर दाखल करण्याची कवीची धडपड लक्षात येते. कथा, कादंबऱ्या, निबंध यांच्यात उतरलेली कथने हळुहळू कालबाह्य ठरू लागतात. संदर्भविहीन होतात. मात्र कवितेतले शिल्प मोडतोड होऊन का होईना, शिल्लक राहाते.

यामुळे श्रीधरच्या कवितेतला बहुआयामी महापाषाण जसाच्या तसा बघून ठेवणे मराठीतील जिवंत वाचक, समीक्षकांनी बघून ठेवणे गरजेचे वाटते. कुणी सांगावे, कदाचित त्याच्या काही कवितांची मोडतोड होऊन कोणी त्याचा सुटा सुटा अभ्यास करेल. एक दिवस हा नमुना म्युझियममध्ये दाखल झालेला असेल. तेव्हा त्यातल्या सुटलेल्या संदर्भातून आपल्या भाषेचा अंदाज करणे कठीण जाईल. याहून पुढचा धोका म्हणजे, श्रीधरच्या बेदरकारपणामुळे काव्यविषय आणि अकाव्यविषय त्याच्या कवितेत येत असतात. दुर्बोधतेचा, अमूर्ततेचा आधार घेऊन एखाद्या वेळेस कवीने इतस्ततः टाकून दिलेल्या कपच्याच शिल्प म्हणून पुढे येतील, आणि त्याचे इतरेजन अनुकरण करतील.

एक स्वार्थी विचार डोक्यात येतो, की जर हा महापाषाण दुर्लक्षित राहिला, तर अल्पाक्षरातून, कमी प्रमाणात कोरलेल्या अक्षरशिल्पांचे काय होईल. याने विषयाचे, शब्दांचे, मांडणीचे जे प्रयोग केले आहेत, त्यातून तत्कालीन मराठी भाषेच्या मर्यादाही दिसून येतात. यावर मात करण्यातून मराठी भाषा आणि अभिव्यक्ती संपन्न होऊ शकेल. याच्या कवितेतले काही अमराठी शब्द, वाक्याची धाटणी किंवा यमके प्रास यांच्या मुळाशी तातडीने व्यक्त होण्याची गरज जाणवते. शुद्ध मराठीचा आग्रह धरून त्याला जे म्हणायचे आहे ते उमटणारही नाही, पण या भाषेतून शब्दांचे संकरण (हायब्रीड) होत नाही. याच्या आणि अशा इतर कवींच्या प्रयत्नांतूनच मराठीच्या कातळात कविता कोरण्याचे तंत्र विकसित होईल. पण त्यासाठी याची आणि इतर कवींची कविता वाचकांपर्यंत पोहोचली पाहिजे. त्याची तपासणी झाली पाहिजे.

कोणत्याही कवितेकडे बघण्याचे काही रूढ रस्ते असतात. म्हणजे एकेका शब्दाचा, ओळीचा अर्थ शोधत कवितेकडे जायचे. हा एक मार्ग. वाङ्मयाच्या

अभ्यासाचा अकादेमीक मार्ग हा अजून एक रस्ता. विविध समीक्षकांच्या दृष्टीने बघणे हा अजून एक प्रकार. त्या कवीनेच काही समीक्षेचा दृष्टिकोन लिहून ठेवला असला किंवा स्वतःच्या कवितेबद्दल लिहून ठेवले असले तर त्याची अशी एक भूमिका आपल्यासमोर असते. त्यादृष्टिने एक बरे आहे, की या कवीने लिहिलेली समीक्षा उपलब्ध आहे. त्यामुळे श्रीधर तिळवे हा वाचक, वाङ्मयव्यूहाकडे कोणत्या नजरेने, कोणत्या निकषावर बघतो ते समजून घेता येते. त्याच नजरेतून त्याची कविता त्याच्याच निकषांवर कोठे उभी राहाते हे ही बघता येते. स्वतःच्या स्वतंत्र दृष्टीनेसुद्धा या कवितेची तपासणी करता येईल. (मर्ढेकरांनी त्यांच्या स्वतःच्या काही कवितांबद्दल न्यायालयात केलेले निरुपण आणि इतरांनी वेगवेगळ्या मार्गाने समीक्षेचा प्रयत्न करूनही म. वा. धोंड यांनी स्वतंत्रपणे केलेली तपासणी हे त्याचे ठळक उदाहरण) त्यासाठी पहिली पायरी म्हणजे कोणत्याही कवितेचे वाचन होऊन, दखल घेतली पाहिजे.

नाहीतर छोट्या जाहिराती, सुभाषिते, चांगल्या जिंगल्सच्या चालीवरची शब्दांची पट्टी हीच कविता म्हणून मान्यता पावेल. शब्दांची जिम लावून शब्दसौष्ठव वाढवून सुजवलेली कविता हीच सजवलेली कविता म्हणून मान्यता पावेल. अज्ञातातील साहित्यिकांच्या नेटवरच्या विचारातून अनुकरण करून नवीन साहित्य लिहिण्याच्या नवीन फॅशनमधून आपण लिहू लागू. मराठीच्या एक दशांशही भाषिक सामाजिक अवकाश नसलेल्या विदेशी भाषेतील अभिव्यक्तीची भ्रष्ट नक्कल बोकाळेल. प्रयोगशरण कंपूबाज करियरिस्ट शब्दजुळारी त्यालाही मान्यता देतील.

असे झाले तर ते आपल्याच पायावर धोंडा पाडून घेण्यासारखे आहे. मात्र धोंडा पायावर पाडून घ्यायचा, का त्याला शेंदूर लावायचा, का त्यातून अवांछित शब्दांच्या कपच्या टाकून आपले असे शिल्प घडवायचे ज्याची त्याची निवड आहे. लिहीत लिहीत मी मराठी भाषेच्या महापाषाणासमोर येऊन उभा ठाकलो आहे. मी तर श्रीधरच्या तिळवेच्या कवितेसमोर उभा होतो.

– **जयंत मो. गाडगीळ**
एम्-४, २७३, महाराष्ट्र हौ. बोर्ड कॉलनी,
लक्ष्मीनगर, पर्वती, पुणे, ४११००९.
चलभाष : ९८६०८१२९८६
अचलभाष : (०२०) २४२३२४०१

# माझी भूमिका

प्रामुख्याने १९८२ ते १९८७ या कालखंडात मी ज्या कविता लिहिल्या त्या डेकॅथलॉन सिरीजमध्ये प्रकाशित होत आहेत. भारतीय समाजाचे जे स्थित्यंतर होत होते त्याचे पडसाद या सिरीजमधील सर्वच कवितासंग्रहात आहे. या कालखंडात मी प्रामुख्याने कोल्हापूर शहरात रहात होतो. त्यामुळे त्याचे पडसाद या संग्रहात उमटणे अटळ होते. गोर्बोचेव्ह आले आणि रशिया कोसळणार हे स्पष्ट झाले त्याचेही प्रतिबिंब या संग्रहात आहे. १९८२ साली मी मार्क्सवाद कोसळणार हे ठामपणे सांगत होतो. पुढे ते म्हणणे सत्य झाले, पण मार्क्सवादाचे असे कोसळणे हे यातनादायक होते. प्रचंड फसवणूक झाल्याची भावना मनात त्यावेळी होती. या भावनेचेही प्रतिबिंब या संग्रहात दिसते. हा संग्रह प्रामुख्याने श्रमिकाशी निगडीत आहे. त्यामुळे तो त्यांनाच अर्पण करतोय.

माझा मित्र कीर्तिकुमार शिंदे याने हा संग्रह प्रकाशित केला त्याबद्दल धन्यवाद.

शेवटी सर्व श्रमिकांचे आभार.

मी जो काही आहे त्यात त्यांचा सिंहाचा वाटा आहे.

**- श्रीधर तिळवे**

# अनुक्रमणिका

# श्रीधर तिळवे यांची 'नवता'पूर्ण साहित्यसंपदा

कवितासंग्रह :

| | | |
|---|---|---|
| १) | **एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्‌गार** | (पॉप्युलर प्रकाशन) |
| २) | **क.व्ही.** | (पॉप्युलर प्रकाशन) |
| ३) | **चॅनेल : स्त्रीवाहिनी** | (शब्दवेल प्रकाशन) |
| ४) | **डेकॅथलॉन** | (शब्दवेल प्रकाशन) |
| ५) | **डेकॅथलॉन : रिअल (मायनस)** | (नवता) |
| ६) | **डेकॅथलॉन : सररिअल (प्लस)** | (नवता) |
| ७) | **डेकॅथलॉन : ट्रान्सरिअल (इन्फिनीट)** | (नवता) |
| ८) | **चॅनेल : डिस्ट्रॉयरी** | (ग्रंथाली प्रकाशन) |
| ९) | **चॅनेल : अंडर दि वर्ल्ड** | (शब्दवेल प्रकाशन) |
| १०) | **चॅनेल : स्त्रीवाहिनी** | (शब्दवेल प्रकाशन) |

कथा :

| | | |
|---|---|---|
| १) | **अमेरिकेचे अध्यक्ष आले तेव्हाची गोष्ट** अर्थात काही रफ काही टफ | (नवता) |
| २) | **आत्मचरित्रातले काल्पनिक क्षण :** टची, टचेबल ॲण्ड अनटचेबल | (शब्दवेल प्रकाशन) |

चित्रपट दृश्यकथा :

| | |
|---|---|
| **मन्वंतर : जोशी की कांबळे** | (नवता) |

समीक्षा :

| | |
|---|---|
| **टीकाहरण** | (शब्दवेल प्रकाशन) |

प्रकाशनाच्या मार्गावर...

| | | |
|---|---|---|
| १) | **मार्गी आणि देशी** (समीक्षा) | (पॉप्युलर प्रकाशन) |
| २) | **चौथी नवता : नवअनियतकालिके** (समीक्षा) | (नवता) |
| ३) | **टी** (कादंबरी) | |
| ४) | **चॅनेल : निर्वस्त्र** (कवितासंग्रह) | |

# मी माझ्या ह्या दशकात

कॅशियस क्लेच्या जबरदस्त ठोश्यासारखा तोंडावर येणारा दिवस
महंमद अलीच्या तिकडमबाज फटक्यासारखी पोटावर आदळणारी रात्र
आणि ह्या धर्मांतरात मधोमध अडकलेला मी
माझं हृदय
जे नेहमीच एक पाय कमळात आणि एक पाय पाषाणात ठेवून वावरलं
रिकाम्या जागा 'भरा'त
सांडल भाषेनं सह्या केल्या नव्हत्या अशा गुप्त कागदपत्रांवर
जिथं सावल्या पडल्या पण शरीरं आढळली नाहीत
अशाच ठिकाणी मी साजरा केला माझ्या लिखाणाचा उत्सव
ज्ञानेश्वरांची भिंत वाचली तुकारामाची गाथा जिथं वर आली ती इंद्रायणी वाचली
ज्योतिबांच्या फुलांच्या सशक्त पाकळ्या वाचल्या
बालकवींच्या फुलराणीवरचे दव वाचले

मर्ढेकरांचा आकांत चाव चाव चावला
मनमोहनांचा भ्रमिष्ट जादूनामा कोळश्यांसकट कोळून प्यायलो
पुशिंची उशी केली बाईच्या कुशीत शिरताना
सुर्व्यांच्या नारायणातला नर अनुभवला
चित्र्यांची तुलीप फुले प्रत्येक गार्डनमध्ये मांडली
डहाकेंच्या दहशतीत शतपावली केली
भाषेच्या ढिसाळ घागरीत ढसाळांचा सागर भरताना पाहिला

आणि मग ह्या दशकात अनुभवला कवितेचा थेट अस्त
भाषेला आंघोळ घालण्याची धमक नसलेले कवी
टमरेलभर पाण्याने तिची गांड धुताना पाहिले

एक विलक्षण एकाकीपण घेऊन चाललोय मी माझ्या ह्या दशकात विदीर्ण
एक हताश दुःख आणि अंगावर येणारी काळाची काळी शिरशिरी
एक अशी घंटा जी वाजत नाही एक असे घड्याळ जे चालत नाही
एक असा आरसा जो चेहरा दाखवत नाही

कित्येक गोष्टी येतायत नवटाक पिऊन माझ्या अंगणात
एक अफवा सत्याचा असा काही विस्तार करतीये
की लोक बेडवरही पार्टनरला मेकअप करायची सक्ती करतायत
एक भविष्य जे भयंकर शोकाकूल आहे की फुलाइतकंच प्रफुल्ल
कळत नाहीये
विलक्षण काहिली होतीये जीवाची
बेचैन बेचैन आहे श्वासात थबकलेला पॉज

मी कसलाही विराम न घेता फास्ट फॉरवर्ड करतोय माझा पेन
आणि कागदावर शाईऐवजी उतरतंय माझं रक्त
काळं पडलेलं

✦ ✦ ✦

# तो

---

तो
माणसांच्या रांगेत शेवटी उभा असलेला मनुष्य
ज्याचा प्रथम विचार करा
असं गांधीजींनी सांगितलं
कसला विचार करतोय?

ज्याने अन्न पिकवले
आणि जो उपाशी राहिला
ज्याने कापूस पिंजला
आणि जो फाटका राहिला

जो हजारो वर्षे शूद्र होता अतिशूद्र होता
ज्याला बसायला घोडा मिळाला नाही कधीच
आणि जेव्हा मिळाला
तेव्हा त्याला मरायलाच पाठवले होते युद्धभूमीवर
कसला विचार करतोय?
जो वर्षानुवर्षे बैलाइतकीच मेहनत करत
मानेवर वजनी ज्यू बाळगत
शेत नांगरत राहिला

जो
लाकडात तोंड खुपसून सुतारकाम करत राहिला
जो
लोखंडात हात बुडवून धातू वितळवत राहिला
जो
पाण्यात जीभ खुपसून रांजणं भरत राहिला

जो भांडला जातीसाठी माती खाताना
जो पंचायतीच्या धाकातही चांभार चौकश्या करत राहिला
ज्याच्या दाढीला सोने चिकटले तर
ज्याने मालकाला मान कापून दिली
ज्याच्या कानात वेदांनी शिसे ओतले तरी
जो डोळ्यांनी स्वर्ग पाहात राहिला
कसला विचार करतोय?

त्याच्या आसपासच्या हवेत त्याची हत्या आहे
त्याच्या आसपासच्या वाऱ्यात त्याच्यावर होणारे वार आहेत
तरीही तो हसत हसत कसला विचार करतोय?

स्वतःच्या तहानेलाही मृगजळ मानण्याचं कसब त्यानं अवगत केलंय.
स्वतःच्या भुकेलाही माया समजण्याचा गृहपाठ त्याला पाठ आहे

त्याच्या डोळ्यात अश्रू येऊ नये म्हणून
तो डोळे सुजवून टक्क नजरेनं पाहतोय हे भकास शतक
सर्वत्र त्याच्या मेहनतीची धूळ उडतीये
आणि सिंहासनावर बसलेले नाक
त्या धुळीने संत्रस्त आहे
तो माणूस
जो इतिहासाच्या कुठल्याच पानावर नाही
आणि तरीही ह्या पृथ्वीचा बराचसा भूगोल ज्याने व्यापलाय
कसला विचार करतोय?

त्याची त्वचा टिकाऊ आहे
आणि संस्कृती तडकण्याच्या प्रत्येक क्षणात
ती अधिकच ताकदीने शाबूत राहिलीये
तो प्रत्येक कामात आसपासच आहे
प्रत्येक परीघ त्याच्या रक्तानेच बनलेला आहे
तो प्रत्येक भाषेचे क्रियापद आहे
आणि तरीही कुठलेच चांगले विशेषण त्याच्यासाठी नाही
शिवाय की मेहनती आणि निष्ठावान
बैलासारखा आणि कुत्र्यासारखा
त्याला भुंकता येत नाही
मात्र मालकाच्या करमणुकीकरिता
त्याने तेही करून दाखवले आहे
तो
जो रस्ता बनवून
निघालाय त्या रस्त्याचा निरोप घेऊन
कुठं चाललाय?

त्याने बनवलेली प्रत्येक वस्तू
त्याच्या आयुष्यापेक्षा जास्त टिकावी म्हणून तो धडपडतो
जो सापडतो

त्यानेच बनवलेल्या गाड्यांच्या खाली
आणि मरताना गाड्यांचा इंग्रजी नंबरही वाचू शकत नाही
कसला विचार करतोय?

जो मेला तेव्हा नेहमीच रिप्लेस केला गेला
जो म्हातारा झाला तेव्हा डिसप्लेस केला गेला
कसला विचार करतोय?

ज्याचं बर्थ सर्टिफिकेट त्याच्याजवळ नाहीये
आणि ज्याचं डेथ सर्टिफिकेट
लाच दिल्यानंतरच मिळणार आहे
कसला विचार करतोय?

जो नाडीत नाडला गेला
जो गाडीत गाडला गेला
जो सडकेत सडवला गेला
जो आडात अडवला गेला

जो कोंड्यात कोंडला गेला
जो धोंड्यात धाडला गेला
जो बंद्यात बंद केला गेला
जो मोडीत मोडीत काढला गेला

कसला विचार करतोय?

हे शतक
जे हातोहात त्याला फसवून गेलं
आता कसलं अत्तर लावणार आहे त्याच्या हातावर?
ध्वज
जो त्याच्या नावाने उभा केला गेला

कोसळतोय
त्याच्या कपड्याइतक्याच चिंध्या होत त्याला काय देणारय?
त्याचा विळा आणि कोयता त्याला काय देणार आहेत
जे कापू शकले नाहीत त्याची झालेली घनघोर फसवणूक?

जे त्याच्यासाठी लढले
त्यांनीच ती लढाई त्यांच्या घरदारावरून फिरवली
अन् आता तो सुन्न होऊन बसलाय
मला दिसतायत त्याच्या आसपास
आत्मपरीक्षणालाही नकार देणारे पोथीनिष्ठ आंधळे
आणि ह्या शतकात चालून चालून
शेवटी गळून पडलेले त्याचे दोन्ही पाय

आता हातावर चालत जाऊन
क्रॉस करायचाय त्याला आख्खा रस्ता
आणि त्याचे पाय त्याच्या हातापेक्षा जड होऊन
त्याची परीक्षा पाहतायत

स्वतःचेच पाय स्वतःच्या हातात घेऊन
हातावर चालत जाऊन
तो कसा क्रॉस करणाराय हा
त्याच्याच रक्ताने लाल झालेला रस्ता?

✦✦✦

## रशियासाठी

तुझा अस्त होतोय आणि विघटनाचे फटाके वाजतायत
मी मार्क्सवादी कधीच नव्हतो
मात्र कामगारांच्या शोषणाविषयी मला कधीच शंका नव्हती
तुझ्यात पडणारा साम्यवादी पाऊस आटून गेलाय
आणि माझ्या देशातील ढग चर्चा करतायत
तुझ्या बदलत्या हवामानावर
पाऊससुद्धा स्वयंभू नसलेले हे लोक

आज मला आठवतोय तुझा दरारा तुझा दात
आणि आता तुलाच कवळीची आवश्यकता निर्माण झालेली बघून
थरकापून गेलाय माझ्या तोंडातला घास
माझा बाप नेहमीच तुझ्या मासिकाचा वर्गणीदार होता
त्यांचा मुलायम कागद पुड्या बांधताना फार मायाळू वाटायचा त्याला
आम्ही म्हणायचोही भाऊ, हीही रद्दी आणि तीही रद्दी
तर तो हसायचा
जणू तोही कधीकाळी मुंबईत कामगार होता ह्याची आठवण जपायचा तो
त्या रद्दीत
जी दर महिना माझ्या घरी यायची

आता ती मासिकं नाहीत
ना त्यांच्यावरची ती रशियन मुलींची सफरचंदी चित्रे

तुझी ईडन गार्डन कोसळलीये
आणि बिन ईश्वराच्या तुझ्या बागेत
फिरतायत कित्येक साप
त्यांची नावे तुझ्याही विश्वकोशात नोंदवली गेलेली नाहीत
तुला वाळवी लागलीये
आणि ती आता काय काय खात जाणारय
ह्याची कुणालाच कल्पना नाही

✦✦✦

# कर्नाटकातील सीमावर्ती प्रेयसीस

तुजा पाठलाग करवत आणलंयस खेचत तू मला ह्या तुझ्या कन्नडिगा शहरात
तुझ्या चेहऱ्यात चंद्र मिसळताना
तुझ्या आवाजात सतार घुसळताना
आणि तुझ्या नाकात चाफा सळसळताना मी पाहिला
आणि मी दीवाना झालो

बडबडणारं आणि गडबडणारं नवागताचं प्रेम समजून घे
प्रणयेश्वरी, जो मुका राहतो त्याचा मुका हुकतो असं म्हणणाऱ्या लावणीबाज शहरातला
आवारा आशिक मी
तुझ्या पाठीमागे तुझ्यावर कटाक्षांची झुंड उडवत
जेवतो आणि माझी बोटे अतृप्त राहतात
पितो पण माझा गळा अवकळा गाळतो
दिवस दिवस नवस फेडल्यासारखा
ह्या तुझ्या घरापुढच्या रस्त्यावर ताटकळतो तुझ्या दर्शनासाठी

तुझ्या खमीस बापाला पत्ता लागलाय माझ्या प्रेमाचा
सीमाप्रश्न सतावतोय त्याला

हृदयेश्वरी,
आपादमस्तक जखम झालोय
मूठभर हस आणि दिवसभर चांदणं पाड
एकदा फक्त हात हलव आणि आयुष्यभर नशिबाला प्रसन्न करून घे

ही जांभुळी त्वचा उजळवण्यासाठी किती जांभळं खाल्लीस?
ही करवंदी चिरेबंदी शिकण्यासाठी किती वाडे तोडलीस?

मेरी जान मेरी बुलबुल मेरी जाने तमन्ना
तुझ्या कन्नडिगा आलममधून हिंदी फिल्मच्या बेल्टमध्ये ये
मला हवाय तुझ्या देहातून झिरपणारा जांभुळ आख्यानाचा खंड
मला हवाय तुझ्या मुबलक केसांचा कृष्णार्जुनसागर
मला बांधू दे तुझ्या पापणीत माझ्या स्वप्नांची आख्खी कापणी
मला नांगरू दे तुझ्या जमिनीत प्रेम करण्याचा हा अजामीनपात्र गुन्हा

भक्ष्यच शोधत आलंय स्वतःचा शिकारी
हा झगमगणारा सूर्य वाया नको घालवूस सकाळच्या पारी

ये
आणि पिऊन टाक
एकटाक
ही नवटाक
जी तुझ्या दारात कधीपासून झिंगतीये

✦✦✦

# मी प्रेमाची शपथ घेऊन सांगतो

मी प्रेमाची शपथ घेऊन सांगतो
की मी प्रेमच करेन तुझ्यावर
आणि प्रेमाशिवाय काहीच करणार नाही

मी वाट पाहताना प्रेम करेन
मी प्रेम करेन तुला ताटकळत ठेवताना
मी प्रेम करेन जेव्हा घड्याळ बंद पडलेलं असेल
आणि मी मरणघाईत नोकरी शोधताना
निसटत्या चुंबनांनी तुझ्यावर प्रेम करेन

मी दुपारच्या आगीत जळताना
झळझळीत प्रेम करेन
मी गर्भगळीत होताना
आख्खी हवा मिळमिळीत असताना
प्रेम करेन

मी प्रेम करेन आसपास द्वेष गडद होत असताना
मी प्रेम करेन आत्मदयेच्या दलदलीत फसताना

मी प्रेम करेन तुझ्या हरणासारख्या चपळ हालचालीत
बेडूकउड्या मारताना
मी प्रेम करेन अंधारात लाईट नसताना तुला अचूक शोधताना

मी प्रेम करेन तू कपड्यात असताना कपड्यात नसताना
मी प्रेम करेन उभ्या उभ्या हसताना रडत रडत बसताना

मी प्रेम करेन आंघोळ घालताना घोळ घालताना
मी प्रेम करेन आंघोळ घालून घेताना घोळ सोडवताना

मी प्रेम करेन प्राणांतिक मरणासन्न मरताना
मी प्रेम करेन त्या शेवटच्या राखेत उरताना झुरताना

✦ ✦ ✦

## कारभारणीस

ही द्वेषाची खूनी नखं
खुपसू नकोस प्रेमानं भरलेल्या माझ्या डोळ्यात
समुद्रात जाळ टाकशील गर्वाचं
तर मासा सापडेल
पाणी नाही

उत्खनन करणाऱ्यांना प्रेतंच सापडतात
इतिहास शोधणाऱ्यांना सापडतात कालबाह्य झालेल्या मुद्रा

प्रेम ही गोष्टच अशी आहे
जी असते
इथे आणि आत्ता
तहानेसारखी
भुकेसारखी

मी मांडून ठेवलीये जोंधळ्याची भाकर आणि बेसनाचा झुणका
पाणी पण आहे माझ्याच काळजातल्या आडातलं

मेंदूतली विचाराची विहीर खणू नकोस आणखी
इकडं आड आणि तिकडं विहीर होईल
आणि निष्कारण गोत्यात येशील

हा वाघच असा
जो हरणं खाऊनच तृप्त होईल
तुझ्या माझ्या संबंधाची

बांधून ठेवू नकोस पदरात माझं स्वातंत्र्य
हात चोळीत बसावं लागतं चोळीत अडकणाऱ्यांना

उडणारी पाखरं उडू देत हव्या त्या शेतावर
जमीन इकडची उचलून तिकडं ठेवता येत नाही
म्हणून झाडं जमिनीत मूळं घट्ट धरून ठेवतात
माणसात नाही

तुझ्या भावाच्या हत्येचं ओझं
लादू नकोस माझ्यावर
त्यानं कुदळ काढली
म्हणून त्यांनी फावडं उचललं

भाऊबंदकीत तुझा भाऊ गेला
म्हणून कुर्बान करणार का तुझ्या माझ्या प्रेमाचा कोंबडा

मी लाकूडतोड्या नाही शेतकरी हाय पोरी
मी झाडांना सांभाळतो कापत नाही

सगळं विसर आणि ये माझ्या मिठीत
बघ,
सूर्य उगवायच्या फूल तयारीत हाय
कोंबडं आरवायची वाट बघतोय दिठीत

✦ ✦ ✦

# आठवणी

मेमसाब
न तुम आती हो ना मौत आती है
मगर जोहराबाई बहोत अच्छा गाती है

हे परेशान हृदय
हे कम्बख्त हृदय

आठवणींच्या मासोळ्या रक्ताच्या नदीत
ऊद जळतोय तुझ्या श्वासांचा
भासामधूनही किरण फुटतायत
आरशामध्ये दिसतायत विभ्रमाचे चेहरे

काळजात
बर्फाचा पाऊस
आणि भिजलेल्या रद्दीची उडती पानं

कुठूनही वाचले तरी तुझेच नाव
जे पुस्तकात सामावले नाही

एक दगड ठेवून गेलीस जड अंतःकरणाने
आणि आवरणावर प्रकरण लिहिता लिहिता त्याचा पहाड झाला

प्रेम पाहता जवाएवढे
त्याचे दुःख पर्वताएवढे
"तिकीट! तिकीट!"- एस्टीचा महावैतागलेला कंडक्टर
महामंडळाच्या भर मंडळीत
मी तुझं चुंबन घेतलं तेव्हा

राधानगरीच्या जंगलात रस्ता हरवल्यावर
वैतागून फेकून दिलेले चप्पल
कुत्र्याने पळवून नेले तेव्हा हसत सुटलेलो मी
आणि आता कशी मी चालणार म्हणून रडवेली तू
नंतर माझी मोठी चप्पल घालून चालताना तुझी उडालेली तारांबळ

"दुःख हे असं झाड आहे
जे जंगल जाळतं"

चिमूटभर उदासीची संध्याकाळ
तुझ्या हुंदक्यांनी काढलेले चिमटे

बाई रडताना बघितली की
आख्खं पर्यावरण नष्ट झाल्यासारखं वाटतं
"कमीना! कमीना! कमीना!
हलकट! हलकट! हलकट!
इतका मख्ख चेहरा कसा काय ठेवू शकतोस तू
रांजणभर दुःखात?"

हे शरीर जे तुझा आवाज शोधत नाहीसं होतंय
आणि ओलं होऊन परततंय
माझ्या मऊसूत तळहातावर
बोलवतंय
त्या नजाकतीला
जी तू निघून गेल्यापासून गायब आहे

तुझ्या हातांचे झरे सदैव वाहतायत
तुझ्या काकणांचा आवाज करत
आणि मी तहानलेला आहे

भूक लागली तेव्हा तुला खाल्लं
तहान लागली तेव्हा तुला प्यालो
जंगली जनावरासारखा वागलो तुझ्याशी
जनावर! अगदी जनावर!

पश्चातापाने काही चमत्कार होतो का?

किती सोसत सोसत सांभाळलीस माझा पाऱ्यासारखा मूड
सूड घ्यावासा वाटला की संडासात जाऊन किंचाळायचीस
''संडासाची हीही उत्सर्जन उपयोगिता'
माझी चेष्टा
आणि मग तुझी भडकलेली नखं
सतत तणावात प्रेम केलं आपण
एकमेकाला ताणवत ताणवत
जणू तुटायचंच होतं

भेटीची अजीबोगरीब उत्कंठा
आणि कुत्तरओढ
एकमेकाची एकमेकात

"चुंबनाची फुलं कब्रस्तानावर चढवता येत नाहीत
बरं आहे
आपण हिंदू आहोत
ओठांसकट डोळ्यादेखत जळतो"

मी प्रेम केलंय तुझ्यावर जळताना विझताना धुगधुगताना
"मी दंतकथा आहे दंतचुंबनांनी इतकं विष सोडेन
की युगपुरुषाऐवजी विषपुरुष होशील"

"वा रे कवी, तुझ्या शब्दांनी गांड तरी धुता येते का?
श्रीधरा, कसा रे व्हायचा तुझा उदरनिर्वाह?"

प्रेमात नष्ट होतानाही प्रेमच पाहिलं आपण एकमेकांच्या डोळ्यांत
वेगळे झालो
आणि आयुष्यभरासाठी ही जीवघेणे उदासी विकत घेतली

तंतू तंतू तुटतोय काळजाच्या वाघाचा
ओठात खोट नसते
चुंबन मुखवटा असू शकते उदासी लपवणाऱ्यांचा

कुठून आलो कुठे पोहोचला
सगळे रस्ते उलटे करून पाहिले उलटे
तर त्याखालीही तुझ्याच पावलांचे ठसे
सर्व काही संपल्यानंतरही उरलेले

कित्येक रात्री झुरून झुरून काढल्या
हात हलवले तर नशीब खाली पडले
आपण तरीही एकमेकाला पाहण्यातच इतके मग्न
की ते उचलले नाही

आत्ता आत्ताच तर तरंग उमटले
आत्ता आत्ताच तर स्तनात गोते खाल्ले
आत्ता आत्ताच शरीरं मळून त्यांची चपाती लाटली
आत्ता आत्ताच तर तू अर्धी खाल्ली मी अर्धी खाल्ली
आत्ता कदाचित माझ्या छातीत तुझं हृदय असेल
आत्ता कदाचित तुझ्या हाताला माझी बोटं असतील
पाठ करून जाताना डोळे आदळतील याचा अंदाज होता
अश्रूही आदळले
पण मी मागे वळून पाहिलं नाही
मला माझं प्रेम अश्रूपर्यंत पोहोचवायचं नव्हतं
निदान ताटातुटीच्या क्षणी
तारे विझत गेले आभाळ ढगासकट खाली कोसळलं
जमीन सापासारखी सळसळली

त्या शेवटच्या भेटीत

जिच्यात मी बसलोय आता तिची कागदी नाव करून
आणि आसपास तुझ्या आठवणींचा महासागर पसरलेला

ना तुम आती हो ना मौत आती है
मगर जोहराबाई बहोत अच्छा गाती है

✦✦✦

# तू येण्यापूर्वी

तू येण्यापूर्वी
आयुष्य मृत्यूपासून बनलं होतं
आणि दुनियादारी पृथ्वीची शवयात्रा काढल्यासारखी चालत होती

बागा सडत होत्या तू येण्यापूर्वी
आणि फुलं फक्त मृतांवर उधळली जात होती

तू येण्यापूर्वी
माझं शरीर होतं एक कोरं चरित्र
आणि त्याला धब्बा लावणाऱ्या एका सहीची वाट पाहात
रक्त बेचैन होतं

तू येण्यापूर्वी
चंद्र फाशीपूर्वीच्या कैद्यासारखा दिसत होता
आणि रात्र जेलरसारखी
आपल्याच जॉबला कंटाळून
अंधारावर गुरकावत होती

आत्ता सारंच कसं झालंय तुझ्या शरीरासारखंच उन्मादक
हालचालीसारखं मादक
आणि प्रत्येक गोष्ट कशी पट्टीची वादळ असल्यासारखी

वाजवतीये प्रेम
आपले हात हातात घेऊन
मुक्त हातांनी

✦ ✦ ✦

## बघता बघता

बघता बघता आख्खा ऋतू बदलला

फळांच्या जागी आला ज्यूस
म्हशींच्या जागी दुधाची थैली
मूळांच्या जागी आले जीन्स
पानांच्या जागी पेशी

ज्या घरात मी रहात होतो
त्याचा नाहीसा झाला जंगली वास
हायवे आले पाय जाळणारे पायांखाली
आणि मातीशी नाळ तोडणारी चप्पल
कंपलसरी झाली

आता प्लास्टिकच्या डोळ्याने कमी-जास्त करायचे
हे इलॅस्टीक जग
फायबरी नाकाने घ्यायचे जगणे चुकवून
जिवंत राहणारे श्वास

आता चुंबन घेतानाही प्रथम भिडायचे
लिपस्टिकच्या शेडला
आणि काळजावर कांळीज ओतताना वाचायचा
ब्राचा रंगीबेरंगी नकाशा

आता नग्नतेला घाबरून पळत राहायचे स्वतःच्या गेंडाळ त्वचेत
आणि पाऊस कोसळताना चढवायचा तडाखेबंद रेनकोट

आता हिवाळ्याला हिवाळा म्हणायचे नाही
पावसाळ्याला पावसाळा
वा उन्हाळ्याला उन्हाळा
आता अनुभवायची माणसांची बिनऋतुची गर्दी
आणि घड्याळांची बटणं लावून करायची
काळाच्या नव्या नव्या शर्टांनिशी
इलेक्ट्रीक सिमेंटी भ्रमंती

आता जमिनीत स्वतःला पेरायचंच नाही
आता आख्खी जमीन
आपल्या F.S.I. मध्ये उगवते का
याची वाट पाहायची

अपराधी नजरेने
निब्बर

✦ ✦ ✦

## दिलीप चित्रे यांच्या
## कोल्हापूर येथील काव्यवाचनानंतर

शेवटी जिभांच्या जागी आलीच
भाषा
कानांच्या जागी टेपरेकॉर्डर

आता सारे कसे सुसंवादी आहे
मुक्या बहिऱ्यांच्या जगात

✦ ✦ ✦

# कासवे आणि ससे

आणि एक दिवस सगळे पक्ष जळाले
जळाली त्यांच्या आतील कासवे
ज्यांचा विचारसरणीवर विश्वास होता
आणि खालून बाहेर आले
शर्यतीचे मॅनेजमेंट करू शकणारे ससे

त्या दिवशी सगळ्या रस्त्यावर होते
माणसांचे बिनपायाचे रक्त
आणि उतरवून ठेवलेले मुखहीन ध्वज

त्या दिवशी सर्वत्र फक्त ससेच धावले
आणि ते नीट दिसावेत म्हणून अवतरले
रंगीत टी.व्ही.

त्या दिवशी शर्यत सगळ्यांना दिसली
आपापल्या घरी

✦ ✦ ✦

# एक सामान्य माणसाचं मामुली आयुष्य

एक सामान्य माणसाचं मामुली आयुष्य
चाललंय
चोवीस तास हिवाळा असलेल्या शतकातून

शतक
ज्याच्या हातावर परिवर्तनाचं अचूक टायमिंग दाखवणारं घड्याळ आहे
आणि जे ते टायमिंग घड्याळाबाहेरही अवतरेल
ह्याची वाट पाहतंय

हिवाळा
ज्याच्या बर्फाखाली एक वसंत प्रतीक्षा करतोय
एका अशा उष्णतेची
जी त्याच्या आगमनावर जमलेलं रक्त साफ करेल

काहीच होत नाहीये
आणि जे होईल असं सामान्य माणसाला वाटलं होतं
ते निखळून पडत चाललंय त्याच्या पायाखाली

बांगला देशाची मुक्तिगाथा
व्हिएटनामचं युद्ध
फ्रँकोचा पाडाव
हिटलरचं पतन
आणि भारताचं पेंटिंगमध्ये उडणारं गांधीवादी कबूतर

त्याचा एक एक विजय गोळी झाडून घेऊन
आत्महत्या करत सुटलाय
आणि तो सैबेरियाचं सैरावैरा धावत सुटलेलं वाळवंट
पाठीवर घेऊन
हिमालयावर आश्रयार्थी
स्वतःचं आयुष्यही नकोसं करून टाकणारं हे शतक चुकवत

एक सामान्य माणसाचं मामुली आयुष्य
जे त्यालाच नकोसं झालं
आणि जे टाकून
तो पळून गेलाय
चाललंय
चोवीस तास हिवाळा असलेल्या शतकातून
त्याला शोधत
एका अशा हिमालयावर
जो स्वतःच त्या सामान्य माणसाला बर्फात लपवून
बहुधा फरारी झालाय

✦✦✦

# घडव

मला कविता लिहायचीच नाहीये
मला सगळी भाषाच नव्याने घडवायची आहे

भाषा
जी मला झाडासमोर शाकाहारी
जनावरासमोर मांसाहारी
आणि माश्यासमोर मत्स्याहारी करील
मी गिळेन तिच्या शब्दांच्या सर्वभक्ष्यी चमच्यातून सगळे समुद्र
मी माझ्या नाममुद्रेत उमटवेन समग्र धरती
मी तिच्या हातांनी टाकेन माझ्या नावासमोर
आडनाव म्हणून आख्खं विश्व
आणि आईबापाच्या जागी उतरवेन
काळ्या शाईची कांबळ ओढून
निवांत झोपणारा परमेश्वर
मी स्वल्पविरामात अडकवेन आख्खा मृत्यू त्याने केलेला माझा पाठलाग
आणि विशेषणात नोंदवेन प्रत्येक आरण्याचा प्रत्येक सुपर्णी श्वास
त्यातील पाणी त्यातील आग
मी तिच्या प्रत्येक स्वरात गाईन आकाश आणि निर्वाणाची अभेद्य स्वरावली
क्रियापदात पाडेन समस्त प्रकाशाच्या गतीची लावण्यखणी सावली

शेवटी घडवून एक समस्त नवी भाषा
मी होईन एखाद्या अद्‌भुतासारखा नाहीसा

तेव्हा माझ्या पाठीमागे उरेल
एक पाठमोरी प्रगाढ शांतता
एक पूर्णविरामाचा ससा

जो अनंत असेल

✦ ✦ ✦

## पृथ्वीमायसाठी

तुझ्यातून जन्मलो
तुझा श्वास झालो
तुझ्यापासून तुटलो
तुझा भास झालो

आता फक्त पायातून
बुटात भटकायचे
मातीत उभे राहून
मातीस झटकायचे

ना माझ्यात उरली
उगवण्याची शक्यता
किती दूर झालो
न करायची वाच्यता

आता फक्त वाहायचे
न बांधता धरण
अन् शेवटी भोगायचे
तुझ्यात थेट मरण

✦ ✦ ✦

# एक लाल दंतकथा

मार्क्सवादी असण्याचा फॅशनेबल काळ
कवितेतून अत्तरासारखा उडून गेलाय

ह्याचा उत्सव साजरा करावा
की दुःख

ही विटंबना मानावी
की वैचारिक उत्पादनाची एक्सपायरी डेट

पेरिस्त्रोयको स्त्रवतंय नळातून पाणी गळावं तसं
थेंब थेंब
माझ्या रक्तात माझ्या घामात माझ्या पाचकद्रव्यात
सॉलिडॅरिटी सोडून पातळ होत चाललेलं हे लोहद्रव
आता कुठल्या पाताळात चाललंय?
बटूची पावलं वाचता नाही आली
की बळी जाणारे पुराणकथेतच स्वतःचे आंधळेपण रचत होते?

एक लाल दंतकथा
स्वतःची कवळी माझ्या कवितेच्या टेबलावर सोडून
समुद्राकडे निघून चाललीये शार्क शोधत
आणि मी माझी जीभ टेबलावर हासडून
गळ्यात अडकून पडलेल्या शिवीसारखा
क्रोधशांत

✦ ✦ ✦

# नाहीतर जा

माझ्या कवितेतील समुद्र हवा तर
माझ्या अनुभवाचं मीठही सोसा
नाहीतर जा
त्या गल्लीत
जिथे पाणपोई आहे

✦ ✦ ✦

# आशा

मी नेता नाही
पण लोकांच्या बाजूचा कवी आहे
मी एक प्रकाश आहे विचारांचा
एक सूर्य
जो थेंबात उतरला आहे माझ्या बोटावरील
लेखणी बनेल आणि प्रकाश लिहील
मी एक आकाश आहे स्वातंत्र्याचं
एक पक्षी
जो फडफडतोय माझ्या वक्षी
ढग बनून उडेल
पाऊस बनून पडेल

मी चालत जाईन शेतातून
आणि राबणारे हात माझ्या कवितेत उगवतील

मी गाईन
मचाणावर उभा राहून
संपूर्ण मानवतेचं गाणं
आणि
माझ्या आवाजात सगळी पृथ्वी
एक होईल

✦ ✦ ✦

## शेवटचे स्वगत

आम्ही नांगरट केली
तर त्यांनी घरदारावरून नांगर फिरवला
आम्ही पिकं घेतली
तर त्यांनी पिकासकट जमीन स्वतःच्या घशात घातली

ती सोडवायला गेलो
तर हातच गहाणवटीला पडले
शेवटी
गाव सोडावा म्हणून चालायला सुरुवात केली
तर पृथ्वीच संपली

✦ ✦ ✦

# पिस्तूलधारी

कधीपासून
एक पिस्तुलधारी
फिरतोय
माझा माग काढत

माझ्या पावलांचे ठसे उमटत नाहीत
आणि माझे श्वास
हवेला माझा वास देत नाहीत

माझ्या कविता मात्र त्याला ऐकू येतायत
आणि तो गोंधळतोय

ज्याचा फक्त आवाज ऐकू येतो
अशा माणसाला कसे मारायचे

त्याच्याजवळ माझा फोटो आहे
पण त्यात माझे डोळे गायब
आणि नाकाच्या जागी लांबलचक जीभ

तो मध्येच आवाज फॉलो करत
हवेत गोळीबार करतोय
आणि क्वचित त्याची गोळी लागून
एक ढग खाली कोसळतोय

फुकटचा पाऊस आणि गोळ्या ओल्या झाल्याची भिती

त्याला संशय आहे
त्याचं पिस्तुल या अवचित कोसळणाऱ्या ढगांनी गंजत चाललंय
आणि माझ्या कविता त्याच्या आसपास रुबाबात हिंडत
माझ्या आवाजाचा माग घेत जगणं
त्याला असह्य झालंय
आणि मी त्याच्या पावलाच्या ऱ्हिदममध्ये
आख्ख्या मानवजातीची घुसमट कवितेत पकडत
माझं कवी असण्याचं कर्तव्य बजावतोय

✦✦✦

## एकदा का

विचारसरणी जास्त झाल्या
म्हणून त्यांचा अस्त झाला
पूर वाहिले
म्हणून गावे वाहून गेली
सूर्य संध्याकाळ झाल्यानंतरही टिकला
म्हणून टिकलीसारखा गळून पडला

आता आयुष्याच्या पुष्कळ पुष्कळ अंगात
उरलंय फक्त खडूएवढं कविता लिहिण्याचं त्राण
एकदा का हा काळोखाचा फळा
लिखाणाने भरला
की झालाच
युगास्त
फळाफळा

✦✦✦

# बोलणे

ज्यांची मूळे पक्की आहेत
ती झाडे फारशी बोलत नाही
ढग ज्यांना पंखाशिवाय उडता येतं
गप्प गप्प असतात
आणि ही पृथ्वी
कुठल्यातरी अशा सृजनव्रतात मग्न
ज्याचा अंतिम परिणाम
तिचे मौन आहे

ह्या जगात फक्त माणसेच तेवढी बोलतायत
बहुधा त्यांच्याजवळ फक्त शब्दच आहेत

✦ ✦ ✦

# यम, मृत्यू आणि कवी

यमराज झाडतोय त्याच्या रेड्यातून
माझ्यावर रोज मृत्यू
रेडा
जो एखाद्या बारीच्या बंदुकीसारखा खडा
रोज मला जिवंत पाहून
आश्चर्यचकित होतोय

त्याला कळत नाही रोज मृत्यू पचवणारा हा गृहस्थ
आहे तरी कोण?
यमाला माहितीये
मी कवी आहे
पण त्याचीही अडचण आहे
त्याच्याजवळ मला मारण्यासाठी फक्त रेडा आहे

तो रोज नेमाने प्रयत्न करतोय
आणि मी मृत्यूला न चुकवता
त्याला शब्दात असा काही बांधतोय
की माझ्या शरीरात वर्डसकोटेड मृत्यूंचा
एक साठाच बनत चाललाय

यमाला वाटतंय
कधीतरी ह्याची विद्रोही भाषा संपेल
आणि मृत्यूच्या ह्या बुलेटस्‌नी
ह्याचे आख्खे शरीर भरून जाऊन थकून विद्रोहात कोसळेल

मी एक असा कवी आहे
ज्याचं ऑफिशियल आयुष्य कधीच संपलंय

आणि जो
शब्दांच्या कृपेने
रोज स्वर्गीय बुलेटस् खात
ह्या पृथ्वीवर अनऑफिशियली विद्रोहात जिवंतय

✦✦✦

# माणसावर श्रद्धा असणाऱ्यांनी

कम्युनिस्ट पायात पडलेत
त्यांच्या पराभवाची धूळ
माझ्या नाकातोंडात विझत चाललेली आग कोंबतीये

समाजवादी गवत खातायत
आणि ते गवत कसं काँग्रेसी नाही
हे भुकेल्यांना पटवतायत

विचारसरणीचं गाजर
तर पुंगी वाजवून वाजवून
सगळ्यांनी मोडून खाल्लंय

एक पाय दुसऱ्या पायाला विचारतोय
इतके चालूनही आपण जिथे होतो तिथेच कसे?

एक कान दुसऱ्या कानात काडी घालून विचारतोय
मळ निघाला का? मळ निघाला का?

एक हात बाईसारखा रडत दुसऱ्या हाताला सांगतोय
आपल्या मेहनतीतून कशी मातीच उगवली त्याची वांझोटी गोष्ट

सगळ्यांनाच आपण माणसाचे अवयव आहोत
ह्याचा विलक्षण कंटाळा आलाय

सर्वत्र उगवलंय सावल्यांचं छिन्नविछिन्न जाळं
आणि ज्यांचा आपल्या आत्म्यावर विश्वास होता
ते घासतायत आपल्या त्वचेवर
कपड्यांच्या संशयास्पद हालचाली

झाडांची मूळं ओळीत मांडून निघून गेलेत लाकूडतोडे

माणसं आरण्यासारखी जळतायत
आणि त्यांच्या किंचाळ्या
कुणातही साधी चाळवाचाळवही करत नाहीयेत

काळजाच्या जागी उरलाय दगड
आणि आख्खी मानवता नारळ फोडल्यासारखी
अनेक बकलात विखुरलेली

आता माणसावर नितांत श्रद्धा असणाऱ्यांनी
कुठं जावं?
टाचणीलाही पडायला भय वाटावं
अशा ह्या शांततेत

✦✦✦

# हे धरतीमाते

मला तुझं रहस्य तोडून
घुसायचं नाहीये आत
तुझ्या गुप्तांगाचा शेवट शोधत
मला व्हायचं आहे एक बीज
जे तू खाऊन
मला देशील जन्म

मला व्हायचं नाही तुझा प्रियकर ज्याला तुझ्या मांड्यांचाही येत नाही अंदाज
मला व्हायचंय तुझा सर्वोत्तम पुत्र
जो खिळवेल आपले डोळे तुझ्या पायावरच घरंदाज

हे धरतीमाते
मला कर तुझ्या डोळ्यातील अठ्ठाविसावं नक्षत्र
जे सत्तावीस प्रियकरांना पेलून
जमिनीतून पीक म्हणून उगवतं
आणि संत भाकरीबाई म्हणून
भुका विझवत माणसाच्या पोटात मावळतं

✦ ✦ ✦

# शेतकऱ्यांचे कल्याणकर्ते

माझी लॅण्ड वेस्ट करून
जाणारे निघून गेले
त्यांच्या सुरक्षित वेस्टमध्ये

जे उरले ते म्हणाले
आम्ही एक अशी इस्टलॅण्ड उभी करू
जिथे सूर्य पूर्वेला उगवेल

मी मग त्यांनी सांगितले म्हणून
रात्रभर जमीन नांगरत राहिलो

माझ्या त्वचेवर जी घामाची नक्षत्रे चमचमली
त्यांच्या प्रकाशात पाहिलं
तर पिकं येण्याऐवजी पसरलं होतं एक रेताड वाळवंट
आणि जमिनीखालचं पाणी पोहोचलं होतं
थेट त्यांच्या घरात

आता सर्वत्र आहे काळोखाची दगडी छत्री
आणि आत्महत्या सुगम व्हावी म्हणून
माझ्यासाठी जमिनीत सोडलेले
सर्वोत्तम गुणवत्तेचे विष

✦ ✦ ✦

## सो

ज्यांच्या शरीरातून रक्त उडून गेलं
आणि तरीही जे कम्युनिस्ट आहेत
त्यांना लाल सलाम

ज्यांच्या डोळ्यातून बुबुळं उडून गेली
निळं आकाश पाहणारी
आणि तरीही जे रिपब्लिकन्स आहेत
त्यांना निळा सलाम

ज्यांच्या हातांची सेक्युलर बोटे जळाली
तीन रंग खेळवणारी
आणि तरीही जे काँग्रेसी आहेत
त्यांना तिरंगी सलाम

त्या हाताने
जो त्यांनी विचारपूर्वक माझ्यापासून तोडून टाकलाय
आणि जो पांढरा पडत चाललाय

शेवटी ह्या शतकाच्या अखेरीला
मी निष्कंलक चरित्र कमावलेच
मेहनत करून कमावलेल्या विचारसरणीचा पापड
चकना म्हणून मोडून खात
त्या दारूबरोबर
जी
मी कधी भांडवलशाहीकडे वळतो
ह्याची वाट पाहात
माझ्या शेतात लपून राहिली होती

सो, एव्हरीथिंग इज फाईन
इन धीस एज ऑफ वाईन

✦ ✦ ✦

## वाचकांसाठी

जे हात तुम्ही कधीच कापू शकला नाहीत
आणि जे मी बुडवून ठेवले
चोवीस तास माझ्या रक्तात
त्यांना आलेली उग्र नखं म्हणजे माझ्या कविता

तुम्ही ती कितीही साखरेत बुडवून खाल्ली
तरी अस्वस्थ करण्याची त्यांची ताकद
नखभरही कमी होणार नाही
हे माझ्या पुस्तकात वाकलेल्या खालमुंड्यानो

✦ ✦ ✦

## युद्धानंतर

शेवटी युद्धानंतर
दोनच जाती उरल्या
मेलेले
वाचलेले

नंतर एन्क्वायरी कमिटी आली
तिने जे वाचले
त्यांच्या दोन जाती केल्या
खूनी
आणि अखूनी

मग समाजशास्त्रज्ञ आले
त्यांनी अखूनींच्या दोन जाती केल्या
जे खून पाहात राहिले
आणि ज्यांनी खून होताना तो होऊ नये म्हणून प्रयत्न केला

मग मानसशास्त्रज्ञ आले
त्यांनी पाहणाऱ्यांच्या दोन जाती केल्या
बधिर आणि भयग्रस्त
प्रयत्न करणाऱ्यांच्या दोन जाती केल्या
नातेवाईक आणि धाडसी

मग जे बधिर होते
ते धाडसींना शत्रू समजायला लागले
जे नातेवाईक होते ते भयग्रस्तांना

मग राजकारणी आले
आणि त्यांनी पुन्हा काडी टाकली
आणि पुन्हा शेवटी उरले
मेलेले वाचलेले

✦ ✦ ✦

## गर्दी

जे पिकवतायत
ते खात नाहीत
जे बांधतायत
ते त्यात रहात नाहीत
जे लिहितायत
ते त्यांचं प्रकाशन दुसऱ्यावर सोपवतायत
जे बनवतायत
ते त्यातील बरंचसं वापरत नाहीत

जे तयार होतंय
ते इतरांसाठी
म्हणूनच ह्या सतराशे साठ गाठी
संबंधांच्या

संबंध
ज्यांच्या मालकी हक्काची तमन्ना
प्रत्येकात वाहत रक्तासारखी
काढत स्वतःला रोज नवे टोक
आणि त्याखाली
नन्नाचा पाढा वाचणारे काही साधे सोपे लोक

ही गिचमीड
ही खिचडी
आख्खं डोकं भणाणून टाकणारी
कोणी शोषतंय
कोणी शोषला जातोय

ही दोन तोंडांनी चालणारी मानवजात
ही हजारो जिभांनी बोलणारी मानवजात
ही लाखो कानांनी ऐकणारी मानवजात
ही करोडो हातांनी राबणारी मानवजात

आपल्या जीन्समध्ये खेळतीये सीन्स
आपण त्यांची लेझीम वाजवत
रिमझिम रक्ताचा सावन अंगावर नाचवत
एकटे
आँखों देखा हालमध्ये बेहाल

आपण एकटे आहोत
याचं दुःख नाही
या अब्जावधी माणसात आपण एकाकी आहोत
याचं दुःख आहे

किती विलक्षण आहे
की आपली सगळी लक्षणे इतरांत आहेत
आणि तरीही ओळखपत्र नसेल
तर इतरांत प्रवेश नाही

एक माणूस आपल्यात
कवितेतून
जो इतरांना सतत फोन करतोय

आणि दुसरा सगळ्यापासून डिसकनेक्ट होऊन
आपल्या आयडेंटिटी कार्डावर
स्वतःचा नवा चेहरा रचतोय
हुबेहूब - पहिल्यासारखाच

हे रोज असं स्वतःला दोन तोंडांनी रचत जाणं
सरणासारखं
माणसांच्या भर गर्दीत

आता मृत्यू येईल तेव्हाच होईल
तिच्यात आपलं अंतिम विसर्जन
तिच्याबरोबरच्या
दुतोंडी संबंधांची शेवटची राखरांगोळी

✦ ✦ ✦

## शब्द

वस्तूंत शब्द भरले
त्या गडबडल्या
माणसांत शब्द भरले
ती बडबडली
झाडांत शब्द भरले
ती हडबडली
प्राण्यांत शब्द भरले
ते खडबडले

मग सगळ्यांच्या त्वचा उतरवल्या
तर आत होते
कपडे तयार करणारे रक्त
अर्थ ओवणारे आतडे
श्वासाची सुई शोधत

✦ ✦ ✦

# ह्या शहरावर

ह्या शहरावर मी प्रेम केलं

ज्यानं मला दात दिले
पण खायला अन्न दिले नाही

हे शहर
ज्याच्या दगडांवर कोरली मी निधडी छाती
ज्याच्या पाण्यावर कोमल गाणी

हे शहर
जे मी गायलो बोटांच्या तारा छेडून

हे शहर
ज्यानं माझ्या बुद्धिमत्तेला एक साधी नोकरी दिली नाही

हे शहर
ज्यानं माझ्या प्रतिभेला विक्षिप्तपणा म्हटलं

हे शहर
जिथल्या एकाही मुलीनं माझ्यावर प्रेम नाही केलं

हे शहर
ज्यानं माझं तोंड काळं करून माझा आवाज काढून घेतला

हा राजवाडा, हा रंकाळा, हे कोटीतीर्थ
ही पंचगंगा, ही अंबाबाई, हा महाद्वार रोड
सर्वत्र सोडून जातोय मी माझे मौन

पुन्हा येईन
तेव्हा सन्मानाने सोडेन

✦ ✦ ✦

# आरण्यांनो

झाडं विखरत चालेत
खोडात बॉम्ब पेरून
निघून गेलेत आतंकवादी
ज्यांना फळाविषयी नफरत होती

आता शाखा प्रशाखा
वांझोट्या हवेत उडतायत
मूळांना जमिनीचा सापडत नाहीये पत्ता
फळे तर ढगांसारखी एकमेकाला ढकलतायत
त्यांच्यातून कुठला पाऊस पडणारय
ह्याची कुणालाच नाही कल्पना

मी फूल की फळ की मूळ
मला कळत नाहीये
मला हवं होतं कवितेत
गगनभेदी वृक्षांचं अफाट जंगल
आणि माझ्या हाती उरलाय केवळ खराटा
जो कुठल्या झाडापासून बनलाय
ह्याचीही मला कल्पना नाही

आरण्यांनो
मला क्षमा करा
मी तुमचा पुत्र होतो
ही आता सांगण्याची गोष्ट राहिलेली नाही अभिमानाने

मीही विखरून पडलोय
तुमच्या वैभवासारखाच
स्वतःत आणि इतस्तत:

✦ ✦ ✦

## ३ जून १९८५

जो ऐकतोय शेतातील स्तब्धतेत
पृथ्वीच्या काळजाचे मौन
ज्याच्या नांगररेषेत वितळतीये
बीजबियाणांची कैद
मी येतो त्याच्या डोळ्यातील तप्त अंगारात
ज्याने कित्येक पावसाळे
पाठ फिरवून जाताना पाहिलेत
ही जमीन
जिथे नदी स्वतःची त्वचा कापत
पाण्याचा बोध सोडते
देखण्या नजरेने पाहतीये माझे पाय
मी चाललोय अनुभवांची कुलुपे तोडत
त्या कोठारांकडे
जिथे माझ्या आईचा हक्काचा भात कैद झाला होता

ज्यांना शरद ऋतुची पानगळ माहिती आहे
तेच बोलू शकतात आशेने
न आलेल्या वसंतावर

ढगांच्या खिडक्या खुल्या झालेत
आणि माझ्या हातातल्या अंगठीत चमकतोय
मान्सूनचा ओला खडा

✦ ✦ ✦

# ऑर्फियस

ऑर्फियस पुढे चाललाय

टीव्हीत प्रकाश सोडत
रस्त्यावर एशियाड सोडत
शाळांत संगणक सोडत
चौकात बूथ सोडत

रिकाम्या जागी बिल्डिंगा सोडत
गाड्यांसाठी फिल्डिंगा सोडत
जाहिरातींसाठी होर्डिंगा सोडत
तरुणांसाठी ग्लायडिंगा सोडत

मी वाट पाहतोय
तो मागे वळून पाहील याची
आणि तो
त्या दिशेनं व्हायोलिन वाजवत चाललाय
ज्या दिशेला युरिडीसी
'मिस युनिव्हर्स' होण्याची तयारी करतीये

✦ ✦ ✦

# गावे

खरेतर या गावांना मी कंटाळून गेलोय
कंटाळलोय इथल्या तंबूतल्या सिनेमांना
ज्यांना कधी एकदा शहरातला उंट आपण आत घेतोय
असं झालंय

एक थकवा येईल असं शेत आहे
आणि त्यातून रोज उगवणारी राख आहे

ही गावे
जी न्हाव्याच्या दुकानात
केस कापून घेतायत
स्वतःचे
माहितीचे
अफवांचे
आणि मिथुन चक्रवर्तीसारखी टिपटॉप दिसायचा प्रयत्न करतायत

मी ज्या रस्त्यांवरून चालतोय
तिथली सावलीही कपडे शिवून मागतीये
आणि सरकारी बागबगिचे
चष्मे लावून
पर्यावरणावर चर्चा करतायत

जो तो काटतोय
आपापल्या वाट्याचे जंगल
ज्याला त्याला हवी
आपल्याच जातीपुरती राखीव जागा

एक वृक्ष
ज्याच्यावर आख्खं गाव मलखांब करणार
असं मला सांगण्यात आलं होतं
कोसळून पडतोय क्रिकेटच्या बॅटीत

जिथे तिथे सुनील गावस्कर बूट घालून चाललाय
आणि आख्खा गाव आपला पाय कापून
त्याच्या साईजप्रमाणे स्वतःला ॲडजस्ट करत चाललाय

खरेतर माझा कंटाळाही बिनकामाचा आहे
आणि मी निघालोय एस्टीतून
दुकाने, घर, चहाचे स्टॉल, पोकळ शाळा, ग्रामपंचायतींची ऑफिसे
त्या कंटाळ्यातून सिगरेटीसारखी फुंकत

✦ ✦ ✦

# झेरॉक्स

पैशाच्या ढिगावर बसून
एक माणूस गांधी टोपी घातलेला
माणसांची झेरॉक्स मारतोय

झेरॉक्स मारतोय पडद्याच्या मागे उभा राहून
गरिबांना पुरवण्यात येणाऱ्या अन्नाची
ठरवून करण्यात येणाऱ्या बदल्यांची
मोर्चावर करता येणाऱ्या गोळीबारांची

झेरॉक्स मशीन
निरंतर पुरवतंय अनुयायी
हुबेहूब आज्ञा पालन करणारे

एक डॉलर कंडोम वाटत फिरतोय
एक पौंड सर्वत्र लाच वाटतोय
एक रुपया भाकरीएवढं तोंड करून झुणका शोधतोय

लोक अन्नाने भरलेल्या कोठारासमोर
भुकेले मरतायत
आणि एक माणूस आपल्या भाषणांची
त्यांच्यापुढे झेरॉक्स मारतोय

अहवालावर अहवाल
कागदावर कागद
मिनीटस्‌वर मिनीट

किती सोप्पं केलंय ऑफिशियल कामकाज
ह्या झेरॉक्स मशीन्सनी

अधिकारी कब्जा घेतायत
अधिकारी रिटायर होतायत
अधिकारी गाड्या उडवतायत
जे आधीच होऊन गेलंय त्याच्या झेरॉक्स मारत

हा देश
जो झालाय एक प्रचंड झेरॉक्स प्रत
शोधतोय
स्वतःची ओरिजनल
किड्यांच्या पोटात गेलेली

✦ ✦ ✦

# झेरॉक्स - २

माणसं एकमेकाची झेरॉक्स मारत
एकमेकांत उतरतायत
आणि झेरॉक्स मशीन
अचंबित नजरेनं पाहतंय
स्वतःची ओरीजिनॅलिटी

त्याला कळत नाही
हा हात,
जो झेरॉक्स मारतोय
मेंदूत बसून
कुणाचा आहे

मेंदू फक्त त्या हाताची बोटं मोजतोय
आणि प्रतींची संख्या
संगणकाकडे पाठवतोय

संगणकाला कळत नाहीये
ही संख्या येते कोठून
आणि ती कशाची आहे

तो फक्त ती नोंद करतोय
आणि माणसाला फुगवतोय

✦✦✦

# इडिपस

पृथ्वीनं स्वतःची त्वचा
स्वतःच गिळायला सुरुवात केलीये
तिला कळून चुकलंय
शेवटी गाय समजूनच खाणार आहे तिला माणूस
तिला या वासराला जन्म दिल्याबद्दल होतोय पश्चाताप
बघता बघता ज्याचा बैल झाला
आणि आईच्याच मागं लागला

ती बर्फ ओढून रोखून ठेवतीये मात्रागमनाची भविष्यवाणी
आणि माणूस ते वितळवत
इडिपसच्या कॉम्प्लेक्स दिशेनं एसी लावत
स्वतःचे डोळे फोडत
च्युतियासारखा चाललाय

✦ ✦ ✦

# आगमन

पाहताना डोळे तडकतायत
स्पर्शताना त्वचा तडकतायत
जेवताना  थाळ्या तडकतायत
पक्वान्नं तडकतायत
पदार्थ तडकतायत

श्वास घेताना नाक तडकतंय
बोलताना जीभ तडकतीये
लिहिताना हात तडकतायत
पेन तडकतायत
कागद तडकतायत

पाजताना स्तन तडकतायत
चालताना पाय तडकतायत
तपासताना नसा तडकतायत
स्टेथोस्कोप तडकतायत
थर्मामीटर तडकतायत

काढताना नखं तडकतायत
घालताना कपडे तडकतायत
शिकताना पुस्तकं तडकतायत
फळे तडकतायत
खडू तडकतायत

काहीतरी आलंय
अदृश्य
सर्वत्र
आवाज न करता

✦ ✦ ✦

# टॉलस्टॉयसाठी एक कविता

माणसाला श्वास घ्यायला किती जागा हवी
माणसाला जेवायला किती जागा हवी
माणसाला प्रेमायला किती जागा हवी
माणसाला मरायला किती जागा हवी

एक वीत? एक हात? एक पुरुष?
किती पावले?

माणसाला घोडे हाकायला किती जागा हवी
माणसाला गाडी चालवायला किती जागा हवी
एक योजनं? एक मैल?

माणसाला विमान चालवायला किती जागा हवी
एक देश? दुसरा देश?

माणसाला अंतराळायला किती जागा हवी
एक ग्रहमाला? एक आकाशगंगा?

किती?
माणसाला मरायला किती जागा हवी?

✦ ✦ ✦

## शिशिर

पानं गळतायत
वृक्ष जे ब्राह्मण नसल्याने सती जात नाहीत
शिशिराबरोबर
आपलं विधवा अंग न लपवता
शोकमग्न

माझ्या पायांनाही नेहमीप्रमाणं भेगा पडतायत
भेगा
ज्या मी कसलेही तेल न लावता पाहतोय उदास डोळ्यांनी
मला माझ्या पायात
शिशिर उतरवून घेणं आवडतं
पाऊल टाकताना क्वचितच मारणारी कळ
मला वृक्षांच्या शेजारी उभी करते

मी शिशिर उतरवतोय
आणि शांत पावले टाकत तो पृथ्वीत पोहोचवतोय
काळाच्या खुल्या झालेल्या खिडकीतून
वारा एक थंड हवेची थप्पड मारतोय माझ्या काळ्या गालावर
चुंबनं ओठातच गोठतायत
आणि प्रेम पाण्यातून वाहता वाहता बर्फ होतंय

माझी आई
जिला मी पायांना आमसोल तेल लावत नाही
ह्याचा प्रचंड संताप आहे
आठवतीये माझे शिशिरमुक्त पाय
तिच्यातून बाहेर येतानाचे

ऐन कार्तिकात मी जन्मलो तिच्या कानात कवितेची घंटी वाजवत
आणि मग आख्खी पानगळ गिळून हसलो 'आई' म्हणताना
डिसेंबर जिझसला क्रुसावर शोधून नाहीसा झालाय
आणि मी मकर अक्षांशावर उभा राहून
थंडीचे शक्तिशाली दात मोजतोय

हे एक बरं आहे की कोल्हापुरात बर्फ पडत नाही
सगळं शहर शेकोट्या पेटवत सकाळ शेकवतंय हातावर
आणि मी चाललोय
पानगळीच्या पुलावरून
थेट वसंताकडे
जो आगमनाची शिळ वाजवत
माझ्या भेगांकडेच येतोय

✦ ✦ ✦

## मी

त्या अंधारातला मी दबा धरून बसलेला मृत्यू
त्या सूर्यामधले मी प्रकाशाचे शव
त्या आकाशातला मी टांगला गेलेलो ढग

ह्या जमिनीतला मी जळून गेलेला कोळसा
ह्या झाडावरला मी आगग्रस्त काटा
ह्या डोंगरामधला मी न निघालेला उंदीर

कोणत्या आधाराने प्रेम करतीयेस मुली

मला जाळायला त्वचा गंधकाची हवी
किंवा अंगभर हवा
आयुष्यभर टिकणारा हिवाळा

✦ ✦ ✦

# लायकी

शेवटी ते झालंच
शेवटी जे होणार होतं

माझ्या कवितेत काय नव्हतं?

पाऊस
घर
उन्हाळा
शिशिर
क्रांती
कोल्हापूर शहर
शेत

पण जेव्हा लोकांची घरे जळाली
तेव्हा त्यांना मिळाली नाही तिच्यात
एकही वीट
ढग होते
पण ते कोरडेच राहिले मृग नक्षत्रात
शेत तर फक्त व्याकरणाचेच पीक काढत राहिले

लोक
जे कवितेत मोठ्या आशेने रहायला आले होते
निघून गेले आयुष्याच्या दिशेने

शेवटी माझ्या कविताही दंतकथाच सिद्ध झाल्या
ज्यांची लायकी
खऱ्याखुर्‍या दातांच्या कवळीइतकीही नव्हती

✦ ✦ ✦

# शब्द

शब्द
रक्तावर खोल संस्कार होऊनही जो
रक्तातून निर्माण होऊ शकला नाही

शब्द
ज्याला रक्तातून निर्माण व्हायचं होतं
आणि जो ह्या रक्तदरिद्री समाजाचं फक्त उत्पादन झाला

शब्द
जो अफवेसारखाच उडत राहिला
सत्याचे ओठ आणि नाक श्वासात हुंगत

शब्द
जो दूरच करत राहिला माणसांना माणसांपासून

शब्द
जो प्रॉपर्टी झाला संस्कृत आणि इंग्रजी भाषेत
आणि राज्यकारण करत राहिला बहुजनांविरुद्ध

शब्द
जो गाजवत राहिला पुराणातून कुराणातून पवित्रेचं कुभांड
आणि अपरिवर्तनीयतेचा सडलेला गंध

शब्द
ज्याच्या बुटाचा नंबर माझ्या बोटापेक्षाही कमीच राहिला ताणवून ताणवूनही

शब्द
ज्याला ह्या समुद्राचा एक थेंबही पिता आला नाही

शब्द
ज्याला कुठलीच शांतता कधी सामावून घेता आली नाही
आणि जो मौनाविषयीही आवाज करत बोलला

शब्द
ज्याने कवींना कवी होण्याचा माज दिला उन्माद दिला

शब्द
जो नेहमी दिसताना माणसासारखा दिसला
आणि माणूस दिसताच माणसाकडे पाठ फिरवून निघून गेला

मरण पावलाय
त्याच्या अमर प्रेतात!
रक्तहीन!
..........
✦ ✦ ✦

# नाक

कुत्र्याचं नाक घेऊन जन्मलो
कवी झालो
हरणाचे डोळे घेऊन जन्मलो
कवी झालो
जिराफाची मान घेऊन जन्मलो
कवी झालो
हत्तीचे दात घेऊन जन्मलो
कवी झालो

आणि आयुष्यभर सोसत राहिलो पाठलाग
त्यांचा
ज्यांची मान शहामृगाची
डोळे वाघाचे
आणि दात मगरीचे होते

मला शेवटी माझ्या
नाकानेच वाचवले होते
कविता लिहिताना
वफादारी राखताना

✦ ✦ ✦

## मला लिहायचीये

येणाऱ्या सर्वभक्ष्यी टीव्हीवर जाणाऱ्या ऐटदार एशियाडवर
आकाशात उडणाऱ्या काल्पनिक गुलाबावर
बेडवर नको त्या वेळी लागणाऱ्या जुलाबावर
पंजाबातील स्फोटावर आसामातील जहाँबाज चहावर
मुंबईतील कॉस्मोपॉलिटीन धातूवर
नेहमी कंडोम घालून खड्या पुण्यावर
उखडलेल्या रस्त्यावर कोसळलेल्या पुलावर

मला लिहायची आहे एक राष्ट्रीय कविता
जन, गण आणि मनं शोधायला बाहेर पडलेले शब्द
घरी परतल्यावर

✦ ✦ ✦

## नोहासाठी

ईश्वरानं आज्ञा दिली म्हणून आलोय तुझ्याकडे
मनुच्या नौकेचा पर्याय होता माझ्याकडे
पण ती मनुस्मृतीच निर्माण करेल ह्या भयाने
गेलो नाही त्याच्याकडे
नौका हिमालयावर पोहोचली म्हणून माणुसकीचे शहाणपण थोडेच येते?

त्यापेक्षा तुझं बरं आहे
आता नौकेत चढण्याआधी बाप्तिस्मा घे म्हणू नकोस
ते काम तुझ्या माझ्या वंशजाकडे सोपव

येताना तू तरी काय घेऊन आला होतास सोबत
आणि जाताना तरी काय घेऊन जाणारयस
तिकिटाचे पैसे अशावेळी नको मागूस

फ्रिज तरंगतायत एसी तरंगतायत तर तरंगू देत
पर्यावरणतज्ज्ञांनी वारंवार धोक्याचा इशारा दिला होता
बर्फ वितळतंय बर्फ वितळतंय बर्फ वितळतंय
हवेला भोकं पडतायत हवेला भोकं पडतायत
पण लक्षात कोण घेतो

बायकोविषयी नको विचारू
जो माणूस इकोफ्रेंडली म्हणून निष्ठेने फ्रिज आणि एसी वापरत नाही
त्याचं कधी कुठं लग्न होतं का?
तुझी पोरगी असेलच की लग्नाची तीच दे

वाघाची वाट नको पाहूस
हत्तीची वाट नको पाहूस
नष्ट झाल्या ना रे बाबा ह्या जाती
जातीसाठी माती खाणाऱ्या नव्हत्या ना रे
नाहीतर माणूस खाऊन टिकवलं नसतं का बापश्या?
झाडाचं बरं आहे
बीजं राहतीलच ना रे काहींची शिल्लक
तुकारामबुवा म्हणून गेले ना रे बाबा
महापुरे वृक्ष जाती। तेथे लव्हाळे वाचती।

तू बाबा ग्रेटच आहेस
कपड्यासकट वाचवलं ना बुवा तू फॅमिलीला
माझं तर शेवटचं बनियनपन गेलं ना बुवा
आणि अंडरवेअरबी
म्हणून तर आलो ना बुवा पडत्या फळाची आज्ञा मानून
तुझ्या जहाजावर
क्या करू? नंगे को तो खुदा भी डरता है ना रे बाबा!

✦ ✦ ✦

# युग

सगळं कसं आपापल्या जागी
बिनचूक होतं

गायीला माहीत होतं अचूक तिचं वासरू
गाडीला माहीत होता तिचा शेतकरी आणि कामगार

टोमॅटोच्या जागी टोमॅटो विकले जात होते
गव्हाच्या जागी गहू

बटाट्यांचे डोळे कुणी काढून घेतले नव्हते भागलपुरी कट करून
मेथीचा हिरवा रंग होता जमिनीतून उगवतानाच हिरवा

मग कुणी एक अंतहीन सुरा खुपसला जमिनीत
आणि तिचा कोथळा बाहेर काढून
काळीज लिलावाला ठेवलं
प्रत्येक डोळ्याने बंदुकीची दारू भरून घेतली बुबुळात
आणि दृश्यं पेटायला लागली स्फोटक बातम्यात

एक अंगुठाछाप आयुष्य अचानक साक्षर झालं
आणि त्यानं प्रथम विद्रोहाचीच मान मुरगाळली
जिच्यात आगीची वाणी होती

प्रगती शस्त्रांची झाली
आणि रक्त मुलांचं वाहिलं

जे मठ माठ होते ते मोठे झाले
अचानक आलेल्या कुंभयुगात

चाकू गर्वानं हिंडू लागले
आणि बंदुका ताठ मानांनी माणसांची शिकार करू लागल्या

जखम जी वाहायची थेंबाथेंबाने
आख्खा माणूस घेऊनच वाहायला लागली
निर्मनुष्य इस्पितळाच्या दिशेने

डॉक्टर शोधावा तर माणसाचाही पत्ता नाही
ह्या युगात
आता येणाऱ्या काळानंच
नर्सिंग होम उघडलं तर उघडलं
माणूस उन्मळून रिकाम्या झालेल्या ह्या जागी

✦ ✦ ✦

# आपण

चांगली माणसं मोजायला बोटं उचलावी लागत नाहीत आजकाल
वाईट मोजायला जावी तर प्रत्येक बोट प्रथम आपल्याकडं

कुणाचा आशीर्वाद घ्यायला जावं
तर सारेच हात कणाभक्ष्यी

माईलस्टोन बांधतानाही
कुणी बांधावा
ह्यावरून पायात पाय घालून भांडण
मग गाठताना तर विचारायची सोयच नाही

स्पर्धेला अंत नाही
आणि हरल्यानंतरच्या विलापाला अर्थ

दुःखाचे डोंगर तर प्रत्येकाच्या वाट्याला
पण झाडं शोधायला जावं तर
तर तीही कापून त्यांचा कमर्शियल वापर केलेला

ज्याचे अश्रू जेन्युइन आहेत असा डोळा आहे कुठं

जी शांतता आहे ती जीवघेणी
जो आवाज आहे तो खूनी

ज्याच्यासाठी जीव लावावा असं काहीच सोडलं नाही आपण ह्या जगात

तर मग हा जीवाचा आटापिटा
कुठल्या आटापाट्यासाठी

सगळं कसं सर्वभक्ष्यी होत येतंय आपल्या दिशेने
आणि आपण शाकाहार व्हायचं की मांसाहार की मिश्राहार
एवढाच चॉईस घेत
आयुष्याच्या थाळीत सुन्न होऊन पडलेलो

✦ ✦ ✦

## आणिबाणीत

मी प्रेम केलं माझ्या अबोली ओठांनी
मी प्रेम केलं माझ्या गुलाबू श्वासांनी
मी प्रेम केलं माझ्या जास्वंदी रक्ताने
मी प्रेम केलं माझ्या कातळी त्वचेने

मी प्रेम केलं तुझ्यात वाहताना
मी प्रेम केलं तुझा संताप साहताना
मी प्रेम केलं तुझ्या मुक्या दुःखात
मी प्रेम केलं जेवणापूर्वीच्या भुकांत

मी प्रेम केलं वस्त्रांत नागडताना
मी प्रेम केलं आंघोळीत बागडताना
मी प्रेम केलं दुकानी दुकानताना
मी प्रेम केलं पंचगंगी मकानताना

मी प्रेम केलं तू पदर पुसताना
मी प्रेम केलं कविता सुचताना
मी प्रेम केलं चुंबन हुकताना
मी प्रेम केलं तुला चुकवताना

मी प्रेम केलं संपूर्ण बोलताना
मी प्रेम केलं अपूर्ण तोलताना
मी प्रेम केलं मौन आकाशताना
मी प्रेम केलं समग्र प्रकाशताना

मी प्रेम केलं अखेर डोळे मिटताना
मी प्रेम केलं श्वास श्वास तुटताना
मी प्रेम केलं काळीज थांबताना
मी प्रेम केलं त्या शेवटच्या वीजेत
आयुष्य लांबताना

ह्या आपल्या घराभोवतालच्या आणिबाणी शतकात
ह्या आपल्या घराच्या इमरजन्सी कैदेत

✦ ✦ ✦

## गोवेकरिणीसाठी : कलंगुटवर

माझ्या त्वचेची दहा बोटे जुळवून नमस्कार करतोय मी

स्त्रीगणेशाय नम:

माझं नाव श्रीधर आहे म्हणून
श्रीगणेशाय नम: म्हणत
तू माझ्या ओठात वाकून गेल्यावर

मला चुंबनाच्या मासोळ्या विकून
समुद्रात लपायला चाललेल्या कोळीणी
मीही आहे एक अस्सल गोयंकर

गुलाबाच्या अंगात सौंदर्याची घंटी वाजवताना
केसांच्या कृष्ण झऱ्यात श्वासांच्या नावा सोडताना
स्तनांच्या दोन घोड्यावर तृष्णेचे पाय देऊन घोडेफेक करताना

घामाच्या मुसळधार पावसात
मलाही करता येतं समुद्री प्रेम

पापण्यांचे तारेमासे फडफडवत
कुठले आभाळ वाहू देतीयेस गालावरच्या खळीत

मी कपडे काढल्यानंतर असतो
मृत्यूइतकाच नागवा

माझ्या काळजाच्या पक्ष्यासाठी
कर खुली तुझ्या स्पर्शाची ज्वालाग्राही खिडकी

तू ज्या जमिनीवर उभी आहेस
ती आहे कामदेवाचे अखरेचे निरुपण झेलणारी चुंबकीय शक्ती
पळून जाण्यासाठी मोकळा केलेला नाही किनारा
समुद्रात घुसशील तर समुद्रासकट खेचून आणेन तुझा देह
माझ्या भाषेच्या जाळ्यात

तेव्हा ये माझ्या खारट मिठीत नदीसारखी
आणि समुद्राला मिळताना
खानदानी गोयंकरासारखी
'नमकीन' हो
ह्या कवितेइतक्याच वफादार शरीरात

✦ ✦ ✦

# मीठ

प्रत्येक दिवस एखाद्या भाजीसारखा

सोमवार पांढऱ्या मुळ्यासारखा
तर मंगळवार पोकळ्यासारखा
बुधवार मेथीसारखा
तर गुरुवार भोपळ्यासारखा
शुक्रवार भेंडीसारखा
तर शनिवार कडू कारल्यासारखा

काळच सब्जीमंडी मांडून आयुष्यात बसलाय
तर जगणाऱ्याने
रविवारचा बाजार टाळावा कसा?

माणसं टोमॅटोसारखी बटाट्यासारखी काकडीसारखी चवळीसारखी
सर्वत्र ओतलेली
आपापली आवड खरेदी करत

एक आंधळी कोशींबीर सर्वत्र
आणि मीठ मात्र जिभेसकट
पळून गेलेले

✦ ✦ ✦

## सामर्थ्य

माझी अनुपस्थिती सर्वत्र अफवा वाटतीये

समुद्र जिंकत जाणाऱ्या सत्यावर
कुणाला विश्वास ठेवायचाय?
सर्वत्र भिंतींचं जाळं
आणि अभेद्य भेदण्याचं नजरधैर्य कुणाजवळ उरलंय?

एक हंगामा तर मामुली झालाय
माध्यम प्रसवणाऱ्या बोलघेवड्या हवेत

ज्यांना शांती हवी आहे ते पितायत लिंबूपाणी

मला अनुमती द्या मी जसा आहे तसाच राहण्याची

नाहीतर
तोंडाला तोंड द्यायला समर्थ आहे
हा कटत चाललेला माझा गळा

✦ ✦ ✦

## वाटू

वाटू
न सांगताच
निघून गेला
माझ्या बालपणातून

तो निरक्षर होता आणि अडाणी
शिवाय करारही नव्हता त्याच्या माझ्यात
की अमूक अमूक वर्षे

मागं मागं यायचा मी कुठंही गेलो तरी
आणि मी थेट दत्तात्रयांसारखा दिसायचो गावकऱ्यांना
गावाला सवयच होती
आम्हाला एकत्र बघण्याची

कवींना जाळणारं एकटेपण माझ्या आयुष्यात कधीच नव्हतं
वाटू विपुलताच होता निष्ठेची

त्याची शेपटी मला पाहिली की थुई थुई नाचायची कारंजासारखी
मी कुठुनही आलो तरी कळायचं त्याला
आणि मग तो आणि मी गावभर

नागेशाला माझ्याबरोबर तोही नमस्कार करायचा
पण का कुणास ठाऊक
शांतादुर्गेशी त्याचं जमायचं नाही
रामनाथीला मात्र आम्ही क्वचित जायचो
कदाचित शेजारीच लीकर मिळायची म्हणून असेल

तो निष्कपट होता माझ्यासारखाच
आणि आनंदीही
तो पाण्याला घाबरायचा नाही
पोहायचा
मी मात्र कधीच तळ्यात उतरलो नाही
विद्याधर मामाच्या तरंगत्या प्रेतामुळे

तो शेपटी हलवत गेला
माझं बालपण घेऊन
आणि परतलाच नाही

✦✦✦

## १९७५-१९८५

एक टीव्हीचा दरवाजा उघडला
आणि सारे निघून गेले त्यातून

एक माणूस
ज्याची हाडं रचली होती कुशल हातांनी
ज्याचं रक्त खास तयार केलं होतं लाल निशाणीने
ज्याच्या काळजात गंधक होतं प्रायोगिक खाणीतलं
निघून गेला
नवीन आलेल्या हवेच्या झुळकीत

माणूस
ज्याला स्वतःच ठरवून घेतलेली उंची गाठता आली नाही

आता
औषधाच्या दुकानात उरलंय आत्महत्येपुरतं विष
बेकरीत शिल्लक आहे उद्यापुरताचा ब्रेड
घरात बाकी आहे आजच्यापुरती भाकरी

कविता लिहिण्यासाठीही काहीच शिल्लक नाही आसपास
इतकी गरिबी कधीच आली नव्हती माझ्या वाट्याला
कुठल्याच दशकात

✦✦✦

## अंतिम इच्छा

मरणाऱ्याला जाऊ द्या सन्मानानं

नका आणू हा फुलांचा हार
झाडांना विद्रूप करून
नका उधळू ही हळद
एखाद्या स्वयंपाकघरात कामाला येईल
ती जेवण करताना
नको काठ्या झाडांचे पाय कापून केलेल्या
नको कपडे
द्या ते त्या नागड्या भिकाऱ्याला
ज्याला माझे शव त्याच्यापेक्षा भाग्यवान वाटतंय
द्या

मला जाळा नागवा
जसा मी आलो होतो

माझा सन्मान त्यातच आहे संस्कृतीधारकऱ्यांनो
मारेकऱ्यांनो
कपडे घालणाऱ्यांनो

✦✦✦

## शिदोरी

मी प्रेम केलं तुझ्या रक्तात जास्वंदीच्या फुलासारखे डौलदार आणि रक्तमय
लटकलो तुझ्या छातीस सफरचंदासारखा पिळले तुझे स्तन आंब्यासारखे
तन्मय झालो शिशिरातही कोसळलेली पाने तुझी आयुष्याच्या ओंजळीत झेलून
थंडीतही झाला वारा जेव्हा मलूल तेव्हाही न झाले माझे श्वास तुझ्या श्वासास पारखे

रस्त्यातही हातात हात पकडताना पकडले नशीबच तुझे जाऊ नये पळून म्हणून
निसटून जाईल स्पर्श वाळूसारखा म्हणून घाबरतानाही केले मी तुझ्यावरतीच प्रेम
आसपास माणसांच्या रुढीग्रस्त नजरा पारंपरिक कटाक्ष आक्षेप घेणारे डोळे
पेलत चालताना पाचोळ्यातूनही शरीराच्या मी तुझे हास्य केले माझ्या डोळ्यात फ्रेम

वयात येताना वयात येण्यापूर्वी वयात आल्यानंतर तुझ्याच बोटांनी मी मोजला काळ
जातीच्या भिंतीपुढे वासनेचा वाघ घेऊन प्रज्वलीत ठेवला मी काळजातला जाळ
आझाद चौकातल्या भुरट्या तणावात मित्रांचे टॉण्ट झेलताना दमछाक झाली तरी
चोरट्या प्रेमपत्रात उघड कबुली दिली लावली दिवाळीत तुझ्याच घरापुढे मी माळ

तुझ्या प्रेमासाठी सूर्यात भटकलो ढगास लटकलो पडताना पडलो तुझ्याच टेरेसवरी
तुझ्या आयुष्यातून निघून जाताना गोळा केली आयुष्यभर पुरेल अशी तुझ्या
शरीरातून शिदोरी

✦✦✦

## जातीमुक्त

अस्पृश्यांनी पाण्यात ढकललं
ब्राह्मणांनी वेदांत जाळलं
क्षत्रियांनी सत्तांत गाडलं
वैश्यांनी नोटांत सपाट केलं
शूद्रांनी नांगराला जुंपून
शेवटी कापून खाल्लं

आणि तरीही शेवटी शिल्लक राहिलो
तेव्हा गळ्यात दिलं
हे कवितेचं मडकं
आणि संतापाचा खराटा

त्यानं स्वतःचंच आयुष्य झाडत झाडत
मी शेवटी जातीमुक्त झालो

✦ ✦ ✦

# शेतकऱ्यांसाठी

ही जमीन काळजात घेऊन
मला जगलंच पाहिजे
जमिनीला नाशवंत समजणाऱ्या ह्या काळात
त्यांच्यासाठी
जे इडापीडा टळो बळीचे राज्य येवो
म्हणत अश्रूतही दिवाळी साजरी करतायत
त्यांच्यासाठी
जे पाणी घेऊन येणाऱ्या ढगाची किंमत जाणतात
त्यांच्यासाठी
जे बीजापोटी आख्खं घर गहाणवटीला टाकतात
त्यांच्यासाठी
जे शेतात कैद आहेत
आणि ज्यांनी स्वतःलाच कुलूप घालून
राजीखुशीनं ही कैद स्वीकारलीये
त्यांच्यासाठी
जे एका अनिश्चित मान्सूनवर भरोसा टाकून
वारंवार धोबीपछाड खाऊनही
त्याच जमिनीवर नशिबाशी कुस्ती खेळतायत

ते लोक
ज्यांच्यासाठी जोंधळ्यावर तारे लटकतात
ते लोक
जे आयुष्याचा पाचोळाही गाण्यात वाजवतात
ते लोक
ज्यांच्या पायाखाली दलदल आणि काळजाखाली कमळ आहे

ही जमीन गायलीच पाहिजे मला त्यांच्यासाठी
नकाशाचे प्रसारण करणाऱ्या ह्या जगात
जे
माणसाला काळजात उभं करण्यासाठी पोट पणाला लावून धडपडतायत

✦✦✦

# निरोप

आता ह्या टेलरच्या दुकानात थांबावंस वाटत नाही दोस्तहो
जिथे मी रक्तवाहिन्यांनी माझं काळीज शिवून घेतलं
आता भाड्यानं घ्यावश्या वाटत नाहीत श्वासाच्या सायकली ह्या सायकल मार्टमधून
ज्या चालवत मी कोल्हापूरच्या प्रत्येक हवामानात हिंडलो

आता नको वाटते सोळंकी कोल्ड्रींक हाऊसमध्ये आईस्क्रीम
ज्यात माझ्या बालपणातील कित्येक म्हशींनी मला हसत हसत दूध दिलं
आता नको वाटतो माझ्याच तिळवे भांडारमधला गव्हाचा ऐटदार दाणा
जो माझ्या आतड्यात चपाती लाटत नेहमी नाभीपर्यंत गेला थेट

आता लग्नाच्या लाडूत ऐकू येतो माझ्या फसलेल्या प्रेमाचा बल्ल्या
जो मला खाऊन पश्चातापायचं होतं

आता ह्या शहरावर प्राण देण्याचे दिवस संपले दोस्तहो
आता रंकाळ्यात वाकून पाहण्याचे दिवस संपले

ही पंचगंगा कवितेत भरून घेऊन मी निघालो मुंबईच्या समुद्रात

आत्ताच पाहून घ्या तुमच्या मित्राच्या ओळखीचा हा शेवटचा थेंब
नंतर बघता बघता समुद्रात विसर्जित होईल हे कोल्हापुरी शव

✦✦✦

## सीमा

ज्यांच्यापर्यंत विचार करता येतो त्यांच्यापर्यंतच आपलं जग
ज्यांच्यापर्यंत आपला फोन जातो त्यांच्यापर्यंतच आपले संबंध
आणि ज्यांच्यापर्यंत आपण आपले लेखन वाचन करतो त्यांच्यापर्यंतच आपलं काळीज

बाकी हे दोन पाय
विचारांना फॉलो करत
संबंधांना फॉलो करत
काळजाला फॉलो करत

जिथपर्यंतच चालत जातात
तिथपर्यंतच आपलं खेडं
आपला मुक्काम पोस्ट

✦ ✦ ✦

# जिथे

जिथे दुःखांच्या नद्या बारामाही
जिथे पिकाइतकेच पिकवले जाणारे दुष्काळ
जिथे खासगी कामगारांचा पगार
त्याच्या हातापेक्षा आखूड

जिथे एका डोळ्यात अश्रू
दुसऱ्या डोळ्यात देव
जिथे हृदय एका जळलेल्या भाकरीसारखं
आणि तरीही खाणारी तोंडे बारा

जिथे दारूत नशेमन आत्महत्या
जिथे वारा पाठ फिरवेल तसा चाबूक
जिथे पाणी अस्पृश्य
जिथे भक्ती ज्याच्या त्याच्या पायरीप्रमाणे

किती रंग किती वर्ण किती धातू किती वंश
जिथे अंगावर फक्त एक गोधडी
आणि नागड्यांनाही एक आध्यात्मिक पंथ

जिथे झोपेत एक नोकरशाही
जिथे जागृतीत एक बुद्ध, एक अष्टावक्र, एक तुकाराम
जिथे चाकूत दिवसाढवळ्या हत्या
जिथे रक्तात दबा धरून क्रिमीनल भूक

जिथे एक कवी त्याचा उपास
जिथे एक भारतमाता की जय जळण्याचा वास

✦✦✦

## बायकोसाठी

तू एक खरीखुरी भारतीय स्त्री आहेस

तुझ्या डोळ्यांत वसंत
आणि जागोजाग नवी फुले क्षणोक्षणी
तुझी कंबर शिशिर
मांसपेशींची पान गळून झडून बारीक झालेली
तुझे केस हेमंत
थंड वाऱ्याच्या झुळकेसारखे
तुझे हास्य शरदाच्या चांदण्यासारखं
तू पेटताना ग्रीष्माच्या झळा
कोसळताना वर्षाच्या मुसळधारा धारा

तू आहेस माझ्या संपूर्ण वर्षाचं कॅलेंडर
जे मी वर्षभर
माझ्या घरात डोळे मिटूनही वाचू शकतो
आणि जे
चोवीस तासात
किमान एकदा
माझ्या डोळ्यांना
सहाही ऋतू दाखवतं

◆ ◆ ◆

## संगणक आला त्या दिवशी

हातोहात केलेली फसवणूक
ज्यात बोटे गायब झाली
त्वचोत्वच झालेली जादू
ज्यात घाम जळाला
जिभोजीभ लावलेला चूना
ज्यात भाषा पळून गेली
नाकोनाक झालेली नाकेबंदी
ज्यात श्वास कैद झाले
डोळाडोळ घुसलेले इंद्रजाल
ज्यात बुबुळे लटकली

माझं आख्खं शरीर कुरतडून
पळून चाललाय ह्या शतकाचा उंदीर
आणि मी त्याने मागे सोडलेल्या माऊसवर स्वार होऊन गातोय
संगणेशाची नवी आरती

जयदेव जय्देव जयश्रीसंगणेशा
पुढून साध्वी आणि मागून रे वेश्या

◆◆◆

# मृत्यू

आईने सांगितलेल्या प्रत्येक गोष्टीत
मृत्यू बाहेरून यायचा
जसा की तो वादळ आहे
आणि काही माणसांना उन्मळवून घेऊन जाणारय
किंवा तो आहे एक पाऊस
जो एखाद्या गटारातून सगळ्यांना समुद्रात पोहोचवणार आहे

यमराज असो की त्याचा रेडा
सगळे बाहेरच उभे असायचे आईच्या कथेत
स्वर्ग असो की नरक
सगळे बाहेरच टांगलेले असायचे तिच्या गोष्टीत

मला मात्र तो वाटायचा अस्पृश्य
ज्याच्या स्पर्शाला सगळे घाबरतायत
आणि ज्याचा विटाळ कुणालाच होऊ द्यायचा नाहीये
आपल्या शरीराला
ज्याच्या सावलीला घ्यायचे नाहीये कुणालाच अंगावर
आणि म्हणूनच ज्याला ठेवलं गेलंय ह्या समाजाबाहेर

पुढे पुढे गावकुसातही मृत्यू होताना पाहिले
आणि वाटलं
हा तर सर्वत्रच आहे
गावात आणि गावाबाहेरही

तो एक असा प्राणी आहे
ज्याला सर्वांनीच स्मशानात बांधून ठेवलंय
आणि तरीही जो घेऊन जातो उचलून
ज्याला घेऊन जायचं आहे

पुढे पुढे मग स्मशानातही जाऊन बसू लागलो
तर तिथे लक्षात आलं
की इथे तर प्रेतेच आहेत जळणारी
किंवा कब्रस्तानात दफन होणारी
मग मृत्यू कुठाय

ताटी बांधताना लोकांना विचारले
मृत्यू कुठाय
खांदा देताना लोकांना विचारले
मृत्यू कुठाय
हार चढवताना लोकांना विचारले
मृत्यू कुठाय
लाकडात जाळताना लोकांना विचारले
मृत्यू कुठाय

लोक बिथरत राहिले
आणि पाल झटकावी तसे झटकत राहिले

आता वाटतं
मृत्यू आहे एक बीज
जे कधी बाहेरून आपल्यात पडतं
तर कधी आपल्यातच विघटनात तयार होतं

आपलंच जुळं भावंड
जे आपल्याबरोबर वाढतं
आपल्यासारखंच दिसतं
ज्याला आपल्याला संपवायचं नसतं
त्याला फक्त एकदाच आपल्याला कडकडून मिठी मारायची असते
संपूर्ण

✦ ✦ ✦

## ■ 'नवता' ची दमदार पुस्तकं ■

❖ **समग्र पानीकम (भाग १ आणि २)** - संजय पवार - पृष्ठसंख्या ३४८+ ३६०, किंमत रु. ६००, सवलतीत रु. ४००

❖ **चोख्याच्या पायरीवरून** - संजय पवार -पृष्ठसंख्या -२७६, किंमत-२५०

(पानीकम आणि चोख्याच्या पायरीवरून - १९९२ ते २००३ या वादळी दशकातील राजकीय-सामाजिक-सांस्कृतिक घडामोडींचं परखड विश्लेषण)

❖ **चँम्पियन्स** - द्वारकानाथ संझगिरी - सुनील गावसकर, कपिलदेव, सचिन तेंडुलकर, इम्रानखान, पेले, महंमद अली, नाडिया कोमानेसी... अशा सोळा महान खेळाडूंची गौरवगाथा- किंमत रु. २२५

❖ **स. न. वि. वि.** - पत्रास कारण की - द्वारकानाथ संझगिरी - खुमासदार खुल्या पत्रांचा अनोखा संग्रह - किंमत रु. १३०

❖ **कोकण जळतासा** - भकास करणाऱ्या विकासाची शोकांतिका - सचिन रोहेकर - रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग जिल्ह्यांमध्ये येऊ घातलेल्या अणु व औष्णिक ऊर्जाप्रकल्पांची झाडाझडती - किंमत रु. १००

❖ **एक होती रेशीमनगरी** - गोपाळ टोकेकर - कल्याणजवळच्या नॅशनल रेयॉन कॉर्पोरेशन कॉलनीच्या उदयास्ताची भावस्पर्शी कहाणी - किंमत रु. १९५

❖ **मन्वंतर - एक दृश्यकथा : जोशी की कांबळे?** - श्रीधर तिळवे - अनेक पुरस्कारांनी गौरविलेल्या 'जोशी की कांबळे' या सिनेमाची दृश्यकथा -किंमत रु. ७५


❖ संपर्क ❖

**'नवता'**

**कीर्तिकुमार शिंदे,**

६०२, आदित्य अपार्टमेंट,

आशानगर, कांदिवली (पूर्व),

मुंबई - ४००१०१

**दूरध्वनी - ९६१९९२२१२६**

ई-मेल - navataa.prakashan@gmail.com




श्रीधरची कविता समोर उभी असते तेव्हा एका महापाषाणासमोर उभे असल्याची जाणीव होते. त्यातून हातोड्याने जोरकसपणे छिन्नीवर घाव घातलेले असतात. काळजीपूर्वक निवडलेल्या विषयावर बेदरकारपणे छिन्नी-हतोडा चालवताना पडलेल्या शब्दांच्या कपच्या इकडे तिकडे उडालेल्या दिसत असतात. एकाच महापाषाणात अनेक विषयांवर शिल्पसमूह असतात. एकाच विषयात दुसरा विषय सुखेनैव घुसलेला असतो. शैली, शब्द इतक्या विविधतेने येतात आणि अनपेक्षितपणे येतात, की भाकित करणे कठीण व्हावे. यात तो अनेक संकेत झुगारताना-स्वीकारताना दिसतो. हळुवारपणे चुबंन घेतो आहे असे जेव्हा वाटते, त्याच्या दुसऱ्या शब्दात कानाखाली काढल्याचे आवाज येतात.

- जयंत गाडगीळ




किंमत: १०० रुपये